
नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)



महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com



# निवेदन

महाराष्ट्र राज्याचे सांस्कृतिक धोरण २०१० अंतर्गत मराठी भाषेतील प्रतिमुद्राधिकाराची (कॉपीराइटची) मुदत संपलेले दुर्मिळ ग्रंथ महाजालावर उपलब्ध करून द्यावे असे म्हटले आहे. त्यानुसार मराठी भाषा विभागाच्या आदेशाप्रमाणे (शासननिर्णय क्र. रासांधो १०१२/ प्र. क./२०१२/भाषा-३ दि. २८ मार्च २०१३) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे असे ग्रंथ आणि नियतकालिके महाजालावर उपलब्ध करून देण्याचा प्रकल्प राबवण्यात येत आहे. त्याच बरोबर प्रतिमुद्राधिकाराच्या कक्षेत येणारी काही साधनेही प्रतिमुद्राधिकारधारकांची उचित अनुमती प्राप्त झाल्यास संस्थेद्वारे संगणकीकृत करून अभ्यासकांसाठी उपलब्ध करून देण्यात येत असतात.

सदर प्रकल्पांतर्गत मराठी अभ्यास परिषद, पुणे ह्या संस्थेद्वारे प्रकाशित करण्यात येणाऱ्या भाषा आणि जीवन ह्या नियतकालिकाच्या (त्रैमासिक) अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासंदर्भात उपरोक्त संस्थेला आवाहनपर विनंती करण्यात आली होती.

सदर विनंती मान्य करून मराठी अभ्यास परिषदेद्वारे सदर अंक संगणकीकरणासाठी उपलब्ध करून देण्यात आले. सदर संस्थेच्या सहकार्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व मराठी अभ्यास परिषद, पुणे यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुररस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व मराठी अभ्यास परिषद, पुणे यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर असणार नाही.

सदर अंक केवळ अभ्यासकांच्या सोयीसाठी संगणकीय स्वरूपात उपलब्ध करण्यात येत असून अंकांतील सामग्रीचे (लेखन, मांडणी, छायाचित्रे, रेखाचित्रे इ.) प्रतिमुद्राधिकार त्या त्या लेखकांकडे अथवा प्रकाशकांनी त्या त्या वेळी केलेल्या व्यवस्थेनुसार आहेत ह्याची नोंद घेण्यात यावी. त्या सामग्रीसंदर्भातील कोणतेही अधिकार वा दायित्वे राज्य मराठी विकास संस्था, मराठी भाषा विभाग किंवा महाराष्ट्र शासन ह्यांच्याकडे असणार नाहीत.

अनुक्रमणिका

रौप्य
महोत्सवी
वर्ष
२५
१९८३-२००७

# भाषा आणि जीवन

मराठी अभ्यास परिषद पत्रिका

वर्ष २५ | अंक ३

पावसाळा | २००७

फेर्दिनां द सोस्यूर (१८५७-१९१३)

अनुक्रमणिका






## अनुक्रमणिका



---

संपादक : प्र.ना. परांजपे
संपादन-सल्लागार : अशोक रा. केळकर, गं.ना. जोगळेकर, मॅक्सीन बर्नसन, अंजली सोमण
संपादन-समिती : प्र.ना. परांजपे (प्रमुख), विजया देव, मृणालिनी शहा, नीलिमा गुंडी
मुखपृष्ठ/विनय सायनेकर, सुप्रिया खारकर
संपादकीय संपर्क व परीक्षणार्थ पुस्तके : प्र.ना. परांजपे, सी-१, सुरजबन सहनिवास, गणेशखिंड मार्ग, पुणे ४११ ००७. दूरध्वनी (०२०) २५६९४६१७
प्रकाशक, मुद्रक, व्यवस्थापकीय संपर्क व पैशांचा भरणा : नीलिमा गुंडी, कार्यवाह, 'मराठी अभ्यास परिषद' ३, अन्नपूर्णा, १२५९, शुक्रवार पेठ, सुभाषनगर गल्ली क्र. ५, वाडिया हॉस्पिटलसमोर, पुणे ४११००२. दूरध्वनी (०२०) २४४८६०१५
मुद्रण-स्थळ : भंडारी मुद्रणालय, सिंहगड मार्ग, पुणे ५१. दूरध्वनी (०२०) २४३४८७५६

---

प्रकाशन : त्रैमासिक: जानेवारी(हिवाळा), एप्रिल(उन्हाळा), जुलै(पावसाळा), ऑक्टोबर(दिवाळी)
सूचना : (१) पत्रिकेत प्रसिद्ध होणाऱ्या लेखांच्या/लेखकांच्या मतांशी संपादक किंवा परिषद सहमत असतीलच, असे नाही. (२) **या अंकाच्या प्रकाशनासाठी महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृती मंडळाचे अनुदान मिळालेले आहे. तथापि या नियतकालिकातील लेखकांच्या विचारांशी साहित्य संस्कृती मंडळ व राज्यशासन सहमत असतीलच असे नाही.** **या अंकाचे मूल्य रु. २५/-**






संपादकीय

# वाचन : एक भाषिक कौशल्य

२००७-०८ या शैक्षणिक वर्षात महाराष्ट्रामध्ये भाषेच्या संदर्भात एक महत्त्वाचे पाऊल उचलले जाणार आहे. ते म्हणजे शालान्त (दहावी) आणि उच्च माध्यमिक शालान्त (बारावी) परीक्षांमध्ये भाषाविषयांसाठी 'तोंडी परीक्षे'चाही समावेश केला जाणार आहे. (नव्या अभ्यासक्रमानुसार २००६-०७ मध्ये इयत्ता नववी व इयत्ता अकरावी या वर्षांसाठी 'तोंडी परीक्षा' घेण्यात आलेली आहे.) 'तोंडी परीक्षा' २० गुणांची असून तिच्यातून 'संवादकौशल्ये' विकसित करण्यावर भर दिलेला आहे. संवादकौशल्यांमध्ये श्रवण (अनुलेखन), वाचन, भाषण आणि संभाषण यांचा समावेश आहे.

अभ्यासक्रम बदलताना भोवतालच्या जीवनातील सांस्कृतिक बदल लक्षात घेतले गेले आहेत. 'मराठी' हा विषय 'प्रथम भाषा' या स्तरावर शिकवितानादेखील व्यावहारिक/उपयोजित मराठीचे शिक्षण विद्यार्थ्यांना अधिक प्रमाणात दिले जावे, अशी वाढती मागणी होती. शिक्षणाचा प्रसार तळागाळापर्यंत होऊ लागल्यावर शिक्षकांसमोर येणाऱ्या सर्व विद्यार्थ्यांना 'भाषा' येत आहे, हे गृहीत धरून मराठीचा अभ्यासक्रम शिकविण्याची पारंपरिक पद्धत बदलणे आवश्यक होते. तसेच इंग्रजी माध्यमांच्या शाळांमधून आलेल्या विद्यार्थ्यांनाही मराठीची भाषिक कौशल्ये शिकविण्याची गरज होती. त्यामुळे अभ्यासक्रम बदलत्या परिस्थितीशी जुळवून घेण्यासाठी उचललेले हे एक पाऊल आहे, असे म्हणावेसे वाटते.

भाषा शिकताना 'वाचन' हे भाषिक कौशल्य किती प्रकारे शिकविणे गरजेचे आहे, याचा विचार करू. खरे तर हे कौशल्य विविध टप्प्यांमधून विकसित होत असते. मूक वाचन, प्रकट वाचन, अभिवाचन असे त्याचे प्रकार आहेत. शालेय स्तरावर फक्त प्रकट वाचनाचे मूल्यमापन होणार असले तरी त्यातून प्रसारमाध्यमांशी निगडित संज्ञापन-कौशल्य, कलाक्षेत्राशी निगडित अभिवाचन-कौशल्य या विकासाच्या दिशा खुल्या होऊ शकतात.

प्रकट वाचनाला आपल्या सामाजिक जीवनात व्यावहारिक कारणांनीही महत्त्व आहे. आपण मुख्यत: श्रवण-संस्कृतीचे उपासक आहोत. (आध्यात्मिक क्षेत्रात आपल्याकडे निरूपणाची म्हणजे समोरच्या श्रोत्यांना अर्थ उलगडून सांगण्याची परंपरा आहे.) त्यामुळे फलकावर लिहिलेली साधी सूचनासुद्धा मूक वाचनातून आपल्याकडे पटकन ग्रहण केली जात नाही. ती सूचना जर कोणी मोठ्याने वाचून दाखवली तर

पटकन कळते. मोठ्याने वाचणे म्हणजेच प्रकट वाचन. हे वाचन अर्थपूर्ण हवे. नाहीतर घडते ते असे : आपण रेल्वेस्थानकावर उभे असतो आणि आपल्याकडे कोणती गाडी कोणत्या फलाटावर येणार, ही माहिती सूचना-फलक दाखवत असतो. ती सूचनाफलक ध्वनिक्षेपकावरूनही ऐकू येत असते. सूचना संपून जाते तरीही आपले कान टवकारलेलेच राहतात ! कारण त्या सूचनेच्या वाचनात योग्य आरोहअवरोह/चढउतार, विराम नसतात. त्यामुळे वाक्य संपल्याचे लक्षातच येत नाही !

प्रकट वाचन करताना अशा कितीतरी गोष्टींकडे लक्ष द्यावे लागते. एक तर शब्दोच्चारांकडे लक्ष द्यावे लागते. घ-ध, श-ष, इत्यादींमधील फरक लक्षात घ्यावा लागतो. मराठीतील च, छ, ज, झ यांचे दोन प्रकारचे उच्चार, 'अ'चे वेगवेगळ्या वजनाचे उच्चार, योग्य ठिकाणी स्वराघात या बाबी माहीत असाव्या लागतात. (मराठीत 'उच्चारकोश' नाही, ही उणीव आता जाणवू लागली आहे.) साध्या ऱ्हस्व-दीर्घातील फरकामुळेही शब्दाचा अर्थ बदलत असतो. उदा० निज, नीज. यात ऱ्हस्वदीर्घ 'इ/ई' व 'ज'चे दोन उच्चार यामुळे झालेला अर्थातील बदल महत्त्वाचा आहे. वाचनात उच्चारणाला म्हणूनच महत्त्व आहे. उच्चाराप्रमाणेच उच्चारणाचा सूर बदलला की त्यानुसारही अर्थ बदलतो. (साहित्यशास्त्रात यासाठी 'काकू' अशी संज्ञा आहे.) शब्दाचा अर्थ वाच्यार्थ घ्यायचा की उपरोधिक अर्थ घ्यायचा, हे त्यानुसार ठरते. तसेच तऱ्हेतऱ्हेची विरामचिन्हे जाणून घेऊन त्यांचाही वाचनात उपयोग करावा लागतो. नाटकातील द्विबिंदुचिन्ह (उदा० राम : म्हणजे 'राम म्हणाला' हा अर्थ) आणि विसर्ग (उदा० स्वत:) यातील फरक कळावा लागतो. संक्षेपांचीही माहिती असावी लागते. (उदा० इ.स. म्हणजे इसवी सन.) दोन शब्द, दोन वाक्ये, परिच्छेद यांमधले विराम हेही महत्त्वाचे घटक वाचनातून उमटावे लागतात. त्यातून गद्याचा ताल आणि तोल सांभाळला जात असतो. वाचणे म्हणजे केवळ अक्षरचिन्हांचे आकलन व्यक्त करणे नव्हे; तर छापील आणि म्हणून निर्जीव शब्दांना अर्थभारीत करणे होय.

अनेकदा विद्यार्थ्यांच्या वाचनात दोन शब्द एकात एक मिसळतात. वाक्याचा ऐकणाऱ्याला वाक्याचा अर्थबोध नीट होण्यासाठी वाक्यातील विराम, अधोरेखा, कंस इत्यादींचे वाचन करताना आवाजाची वेगळी पट्टी कशी वापरायची, हेही कौशल्य शिकवावे लागते. आधी न वाचलेला उतारा पहिल्यांदा वाचताना, सुरुवातीलाच वाक्याचे पुढचे वळण हेरता यावे लागते. ते जमले नाही, तर वाक्य तोल गेल्यासारखे घरंगळत जाते. तसे न होऊ देण्यासाठी व्याकरणावर पकड असायला हवी. वाक्यांचे विविध प्रकारचे रचनाबंध, त्यातील गुंतागुंत, त्यांची अर्थअभिव्यक्तीची क्षमता यांचे सूक्ष्म भान हवे. वाक्प्रचारांमधील अर्थसौंदर्याचे भान हवे. [उदा० 'त्याची फे फे उडाली.' हे वाक्य वाचताना 'फेफे'चा 'नेने'सारखा आडनाव समजून उच्चार केला,

तर वाचणाऱ्याचीच फे फे उडत आहे, हे जाणवेल.] त्यासाठी मूक वाचनाचा व प्रकट वाचनाचा मोठ्या प्रमाणावर सराव करायला हवा. राम गणेश गडकरी यांच्या नाटकातील पल्लेदार वाक्ये पेलणे, हे नटासाठी आजही आव्हान मानले जाते.

वाङ्मयप्रकाराच्या अंतर्गत गरजांनुसार वाचनातही काही पथ्ये पाळावी लागतात. नाट्यउतारा वाचताना कंसातील रंगमंचीय सूचना लक्षात घेऊन संयत वाचिक अभिनय अभिप्रेत असतो, तर कथा, ललित लेखन इत्यादींमध्ये वापरलेल्या बोली-भाषेचा हेल, प्रमाण मराठीपेक्षा वेगळा असावा लागतो. वृत्तबद्ध कवितांचे वाचन करताना छंद:शास्त्राच्या नियमांची ओळख असावी लागते. त्या त्या वृत्ताच्या चालीचा ठेका माहीत असावा लागतो. आजच्या आधुनिक तंत्रज्ञानाच्या साहाय्याने अनेक वृत्तबद्ध कवितांचे उत्तम वाचन ध्वनिमुद्रित रूपातून विद्यार्थ्यांच्या कानी पडेल, अशी व्यवस्था करून त्याद्वारे मराठीचे भाषिक संचित पुढच्या पिढीपर्यंत पोहोचवता येईल.

गेय कवितांची लय कानाला सहज जाणवते. पण मुक्तछंद किंवा मुक्तलयीतील कवितेतही सूक्ष्म, तरल स्वरूपाची लय कार्यरत असते आणि ती वाचनातून जाणवायला हवी. शब्द अर्थासकट वेगळ्या उंचीवर नेण्याची किमया त्या लयीमध्ये असते. अर्थपूर्ण विराम, उच्चारातील कमीअधिक तीव्रतेचा आवेग यातून कवितेतील अंतर्गत लय साकार होते. त्यातून अर्थ प्रकाशमान होत जातो. इंदिरा संत आणि नारायण सुर्वे या दोन भिन्न प्रवृत्तीच्या कवींच्या कवितांचा पोत वेगळा आहे, हे त्यांच्या वाचनातून जाणवायला हवे. हळुवार भावना व्यक्त करणारी कविता 'हळू आवाजात वाचणे' आणि वक्तृत्वपूर्ण कविता 'कानावर आघात करील अशा तऱ्हेने वाचणे', हे कवितावाचनातील फारच ढोबळ भेद ठरतात. एकसुरीपणा टाळून कवितेतील नेमका सूर उचलणे, काव्यात्म विधाने खंडित रूपात न वाचता एकात्म वाटतील अशा रीतीने वाचणे आवश्यक असते. आपल्याकडे पु.ल. देशपांडे आणि सुनीताबाई यांनी बा.सी.मर्ढेकर यांच्या कवितांच्या वाचनाचे कार्यक्रम केले होते आणि मर्ढेकरांच्या दुर्बोध गणल्या गेलेल्या कविता श्रोत्यांपर्यंत पोहोचविण्यात ते यशस्वी झाले होते, याची येथे आठवण होते. आता संदीप खरे यांच्या काव्यवाचनाच्या ध्वनिमुद्रिका उपलब्ध आहेत. चांगल्या कथा, कविता, नाट्य इत्यादी वाचनाच्या ध्वनिमुद्रिका ऐकताना भाषेतील रहस्यमय जागांचा श्रोत्यांना सहज ठावठिकाणा घेता येतो, हे कळते. मोठ्याने वाचताना वाचक आशयाशी तन्मय असावा लागतो. गुणाढ्याने केलेले आपल्या कथांचे वाचन ऐकताना अरण्यातील पशुपक्षी सुद्धा कसे भान विसरून गेले होते, याविषयीची प्राचीन काळातीळ गोष्ट आठवते ! मुळात शब्दाचा अर्थाशी घडावा लागतो; तरच वाचक आणि श्रोते यांच्यामध्ये संवाद खऱ्या अर्थाने घडू शकतो. आपल्याकडे 'ध्वनी' हा नित्य की अनित्य याविषयी एकेकाळी काव्यशास्त्रज्ञांमध्ये वाद झालेला आहे. उच्चारलेला ध्वनी वाऱ्यावर

विरून जातो, हे खरे ! पण तो उत्तम तऱ्हेने वाचला तर श्रोत्याच्या मन:पटलावर कायमचा कोरला जातो, हे लक्षात ठेवायला हवे.

खरे तर, वाचनाच्याही अनेक पायऱ्या आहेत. अक्षर-चिन्हांचे वळण ओळखणे. ही अगदी पहिली पायरी आणि साहित्यातील 'रिकाम्या जागा' ओळखणे ही वरची पायरी होय. येथे त्याचे एक उदाहरण द्यावेसे वाटते. गौरी देशपांडे यांच्या 'कलिंगड' (''आहे हे असं आहे'', मौज प्रकाशन, मुंबई १९७६). या कथेत एका अनाथ मुलीला दत्तक घेतलेल्या जोडप्याची कथा आहे. ती अनाथ मुलगी-रोहिणी-एकदा मैत्रिणीकडे वाढदिवसाच्या पार्टीला जाते. तेथून आल्यावर तिची आई-माई-तिला विचारते, ''कशी झाली पार्टी ?'' ती उत्तरते, ''छान.'' तेव्हा आईवडील पटकन ओळखतात की हिचे काहीतरी बिनसले आहे ! आपला का बरं वाढदिवस साजरा होत नाही, ही तिची खंत असणार ! कारण खरंच जर तिला पार्टी 'छान' वाटली असती तर तिने पार्टीविषयी भरभरून सांगितले असते. ती एका शब्दात तुटकपणे सांगून थांबलीच नसती ! येथे, 'छान' या शब्दाच्या उच्चारातून समाधानाची भावना झिरपता कामा नये त्याचा सपाट, यांत्रिक उच्चार केला जायला हवा !

भाषेतील 'वाचन' हे शेवटी माणसाचे मन वाचण्याच्या कलेचे एक अंग आहे. त्यामुळे वाचन या भाषिक कौशल्याचे महत्त्व व्यावहारिक व कलात्मक (सांस्कृतिक) अशा दोन्ही स्तरांवर आहे.

नीलिमा गुंडी

---

**मुखपृष्ठासंबंधी**

या अंकाच्या मुखपृष्ठासाठी फेर्दिनां द सोस्यूर (१८५७-१९१३) या प्रज्ञावान भाषावैज्ञानिकाची निवड केली आहे. जिनिव्हा विद्यापीठात त्यांनी दिलेल्या व्याख्यानांची टिपणे एकत्र करून त्यांच्या विद्यार्थी-सहकाऱ्यांनी त्यांच्या मृत्यूनंतर 'कोर्स द लिंग्विस्टिक जनराल' हे पुस्तक १९१६मध्ये प्रसिद्ध केले. त्यामुळे ऐतिहासिक व तुलनात्मक भाषाशास्त्रात सीमित झालेला भाषाभ्यास आधुनिक भाषाविज्ञानात उत्क्रांत झाला. त्या पुस्तकातील मर्मदृष्टीमुळे चिन्ह मीमांसेला चालना मिळाली आणि मानव्यविद्या व सामाजिक शास्त्रांतील संरचनावादाची पायाभरणी झाली.

सोस्यूर यांचा जन्म जिनिव्हा येथे एका बुद्धिमंतांच्या घराण्यात झाला. त्यांचे वडील निसर्गशास्त्रज्ञ होते. लॅटिन, ग्रीक, संस्कृत, जर्मन, फ्रेंच इ० भाषांचा जिनिव्हा येथे अभ्यास केल्यानंतर वयाच्या १९व्या वर्षी त्यांनी लाइप्झिग विद्यापीठात पदवी-अभ्यासक्रमासाठी प्रवेश केला. एकविसाव्या वर्षी बर्लिन विद्यापीठात एक वर्ष अभ्यास करून त्यांनी 'इंडो-युरोपीय भाषांतील कांही आदिम स्वरप्रणालीवरील प्रबंध' हे पुस्तक लिहिले. १८८०मध्ये ते लाइप्झिगला परतले व तेथे त्यांना डॉक्टरेट मिळाली. १८८० ते ९१ ही अकरा वर्षे त्यांनी पॅरिसमध्ये अध्यापन केले. पुढची बावीस वर्षे त्यांनी जिनिव्हात अध्यापन केले. भाषाविज्ञानाचे अध्यापन त्यांनी १९०६ ते १३ अशी एकूण सात वर्षे केले.

---

# भाषा वेगळ्या झाल्या कशा ?

विश्वनाथ खैरे

'भाषेचे आणि भाषाभ्यासाचे विकसन' याविषयीच्या 'वृद्धिः :..' या आपल्या पुस्तकाच्या आरंभी दिनेश द. माहुलकर लिहितात : ''प्राचीन काळापासून भाषेसंबंधी ज्या एका प्रश्नानं माणसाला खूप गोंधळात टाकलं आहे तो असा की, भाषा वेगवेगळ्या का असतात. सर्वत्र, सर्वकाल माणसं एकच भाषा का बोलत नाहीत ? युरोपातल्या ज्या विद्वानांनी या प्रश्नाचं उत्तर देण्याचा प्रयत्न केला त्यांनी त्यासाठी आपल्या ख्रिस्ती धर्मातल्या एका कथेचा आधार घेतलेला आढळतो.'' यानंतर बायबल (जेनेसिस ११)मधील ती कथा माहुलकरांनी सारांशाने दिली आहे. (माहुलकर २००२:१)

सतराव्या शतकाच्या सुरवातीला जेम्स राजाच्या आज्ञेने इंग्रज धर्मगुरूंनी ग्रीक संहितेवरून बायबलचा इंग्रजी अनुवाद केला. त्यातली या कथेची महत्त्वाची कडवी अशी आहेत :

(१) अवघ्या धरतीची भाषा एक होती, बोली एक होती.
*(अँड द होल अर्थ वॉज ऑफ वन लँग्वेज, अँड ऑफ वन स्पीच.)*

(२) झाले काय की, ते उगवतीकडून चालत आले, तेव्हा त्यांना शि-नार देशात मैदान मिळाले आणि ते तेथे राहिले.

(३) आणि ते आपसात म्हणाले, चला, आपण विटा थापू आणि चांगल्या भाजू. मग त्यांनी दगडासाठी वीट अन् चुन्यासाठी चिखल लावला.

(४) आणि ते म्हणाले, चला, आपण नगर आणि मिनार उभारू. मिनाराचे शिखर स्वर्गाला पोचावे आणि आपण आपल्याला नाव घेऊ, नाहीतर आपण साऱ्या धरतीच्या पाठीवर विखरून जाऊ.

(५) आणि मानवाच्या लेकरांनी उभारलेले ते नगर आणि मिनार बघायला ईश्वर खाली आला.

(६) आणि ईश्वर म्हणाला, बघा लोक एकोप्याने आहेत आणि त्यांची भाषा एक आहे आणि त्यांनी हा घाट घातला आहे. आता त्यांनी जे डोक्यात घेतले आहे ते काहीच त्यांना दुर्घट नाही. (*अँड द लॉर्ड सेड, बिहोल्ड, द पीपल इज वन,*

*अँड दे हॅव ऑल वन लँग्वेज; अँड धिस दे बिगिन टु डू : अँड नाउ नथिंग विल बि रिस्ट्रेन्ड फ्रॉम देम, व्हिच दे हॅव इमॅजिन्ड टु डू.)*

(७) चला, खाली जाऊ या आणि त्यांची भाषा बावळी करू या. म्हणजे त्यांना एकमेकांचं बोलणं कळायचं नाही. (*गो टु, लेट अस गो डाउन, अँड कन्फाउंड देअर लँग्वेज, दॅट दे मे नॉट अंडरस्टँड वन अनदर्स स्पीच.*)

(८) मग ईश्वराने त्यांना तेथून साऱ्या धरतीच्या पाठीवर विखुरले आणि त्यांनी नगर उभारणे सोडून दिले.

(९) त्याचमुळे नगराचे नाव बाबल पडले. कारण ईश्वराने त्यात साऱ्या धरतीची भाषा बावळी केली. आणि ईश्वराने तेथून त्यांना साऱ्या धरतीच्या पाठीवर विखरून टाकले. (*देअरफोर इज द नेम ऑफ इट कॉल्ड बाबल; बिकॉज द लॉर्ड डिड देअर कन्फाउंड द लँग्वेज ऑफ ऑल दि अर्थ : अँड फ्रॉम देन्स डिड द लॉर्ड स्कॅटर देम अॅब्रॉड अपॉन द फेस ऑफ ऑल दि अर्थ.*)

**पुराणकथा, गावाच्या नावाची**

पृथ्वीवर एक भाषा एक बोली, स्वर्गापर्यंत पोचणाऱ्या मनोऱ्याची बांधणी, देवाला पडलेली चिंता, देवाचे नगरात आगमन, देवानेच सगळ्या जगातली भाषा नाकळती करून टाकणे, यांसारख्या गोष्टींवरून ही पुराणकथा आहे हे उघड आहे.

बाबल नगराच्या नावाचा उगम सांगण्यासाठी ती रचलेली आहे हे नवव्या कडव्यावरून स्पष्ट होते. बाबल हे नाव किंवा गाव काल्पनिक नाही. सध्या ज्याला इराक म्हणतात त्या देशातल्या प्राचीन संस्कृतीचे हे नगर इंग्रजीत 'बाबिलोन' या नावाने ओळखले जाते. त्या संस्कृतीच्या खनितांमध्ये, विटांचा वापर करून बांधलेल्या मनोऱ्यांसारख्या इमारतींचे अवशेष आहेत. युफ्रतिस आणि तिग्रिस या दोन मोठ्या नद्यांनी आपल्या गंगायमुनांप्रमाणे बनवलेल्या गाळवट मैदानासारख्या या देशात दगडाचा अभाव असल्यामुळे विटांचाच वापर बांधकामात होत असे. पुराणकथांच्या तंत्राला धरून, वास्तवातल्या त्या गोष्टींचा समावेश कल्पनेतल्या कथानकात झाला.

कथानकात देवाला आणून नगरालासुद्धा अज्ञात भूतकाळाचे वलय दिले. नगराचे नावही प्राचीन आणि त्यामुळे न कळणारे असल्याचे भासवून, त्याचा अर्थ शोधण्याचे प्रयोजन कथेला दिले. (रामाने वाळूच्या शिवलिंगाची पूजा केली त्या जागेला रामेश्वर नाव पडले, अशी आपल्याकडे कथा आहे.) त्यानुसार बाबल नाव पडण्याचे कारण सांगितले ते असे :

*देअरफोर इज द नेम ऑफ इट कॉल्ड बाबल; बिकॉज द लॉर्ड डिड देअर कन्फाउंड द लँग्वेज ऑफ ऑल दि अर्थ.*

पुराणकथेच्या तंत्रानुसार, नगराचे नाव आणि बिकॉजने सुरू झालेल्या गौण वाक्याचे क्रियापद यांच्यात ध्वनीच्या सारखेपणाचा संबंध असायला हवा होता. इंग्रजीतल्या 'बाबल' आणि 'डिड कन्फाउंड' यांच्यात किंवा जर्मन, ग्रीक आणि लॅटिन संहितांमधल्या अनुवादशब्दांमध्येही हा ध्वनी-अर्थ संबंध दिसत नाही. मूळ हिब्रू पाठात मात्र, शहराचे नाव 'बाबल' आणि 'डिड कन्फाउंड' या अर्थाचे क्रियापद 'बलल' असल्यामुळे, पुराणकथेला जरूर होता तितपत तो संबंध विद्यमान आहे.

**वास्तव आणि कथांची विविधता**

बाबल हे शहराचे नाव या अकराव्या अध्यायात पहिल्यांदाच आलेले नाही, आधीच्या दहाव्या अध्यायात आलेच आहे :

(१०) आणि त्याच्या (निमरोदच्या) राज्याचा आरंभ शिनार देशामधील बाबल, आणि एरेश् आणि अक्कद, आणि कालनेह येथे झाला होता. *(अँड द बिगिनिंग ऑफ हिज (निमरोद्'स) किंगडम वॉज बाबेल, अँड एरेश्. अँड अक्कद, अँड कालनेह इन द लँड ऑफ शिनार.)*

म्हणजे, स्वत:च्या काळात अस्तित्वात असलेले त्या शहराचे आणि त्यातले 'जिगुरात' या मनोऱ्यांसारख्या इमारतींचे अवशेष पाहून, पुराणकथाकाराने त्यांचा (मिथ्य) संबंध जोडला आणि अकराव्या अध्यायातली कथा रचली.

बायबलच्या यहुदी लेखकांच्या पुष्कळच पूर्वीचे बाबिलोनचे जे रहिवाशी होते त्यांच्या 'एनुमा एलिश' ('जेव्हा उंचावर') या अक्कद/सुमेरियन भाषेतील पुराणात बाबिलोन या नावाचे स्पष्टीकरण मर्दुक या त्यांच्या देवाच्या तोंडी घातले आहे : ''देवांसमोर मर्दुकने घोषित केले, 'एक भव्य प्रासाद आणि मंदिर बांधण्यासाठी मी जमीन पक्की ठोकून घेतली आहे. स्वर्गातून तुम्ही खाली याल आणि सभा भरवाल तेव्हा तुम्हाला रात्री त्यात वस्ती करता येईल. मंदिराला मी बाबिलोन नाव ठेवीन. त्याचा अर्थ 'थोर देवांचे मंदिर'. कुशल कारागीर ते बांधतील.'' (रोझेनबर्ग १९९२/१६५)

या कथेत माणसांना स्वर्गाला पोचवण्याऐवजी देवांनाच पृथ्वीवर आणले आहे. पुराणकथांमधली स्पष्टीकरणे त्या कथा रचणाऱ्यांच्या इच्छेनुसार अशी बदलत असतात. 'पाचरी लिपी'त लिहिलेल्या या पुराणाच्या विटकरी पाट्या सन १८४५ नंतर सापडल्या आहेत. त्यामुळे नगराच्या नावाची ही पूर्वपीठिका सतराव्या शतकातल्या विद्वानांना माहीत असण्याची शक्यता नव्हती.

**कथेवरून गृहीत**

मूळ हिब्रू बायबलचे आणि त्याच्या इतर भाषांतील अनुवादांचे वाचक एकूण बायबलच्या शब्दावर श्रद्धा ठेवणारे असल्यामुळे बाबल मनोऱ्याची कथा त्यांच्या लेखी

सत्यकथा होती. सर्वांशाने सत्यकथा कदाचित नसली तरी भाषांच्या विविधतेचे एक स्पष्टीकरण देणारी तरी निश्चितच होती.

त्यामुळे 'अँड द होल अर्थ् वॉज ऑफ वन लँग्वेज, अँड ऑफ वन स्पीच', ही आदिम मानलेली स्थिती बहुसंख्य युरोपियन समाजाच्या ध्यानीमनी ठसलेली होती. भाषाशास्त्रज्ञ त्याला अपवाद नव्हते. म्हणून १७८३-८६ सालात संस्कृत-ग्रीक-लॅटिन यांचे साम्य विल्यम जोन्स यांच्या लक्षात आल्याबरोबर त्यांनी अशी मांडणी केली की, 'या भाषा आधीच्या कोणत्या तरी एका मूळ भाषेतून निघाल्या आहेत असे कोणीही भाषाशास्त्रज्ञ म्हटल्याशिवाय राहणार नाही.' तसे भाषाशास्त्रज्ञांनी म्हटलेच आणि तिन्ही भाषांच्या एका मूळभाषेची कल्पना गृहीत धरली. कल्पित मूळ भाषेला त्यांनी 'इंडोयुरोपियन' असे नाव दिले. यांसारख्या इतरही भाषांचे संबंध शोधतशोधत भारत-युरोपीय ऐतिहासिक भाषाविज्ञानाची उभारणी झाली. ती उभारणी भाषिक निरखणांवर आधारलेली होती तरी,मूलाधार मात्र एका मूळ भाषेच्या संकल्पनेचा होता आणि त्या तिची बांधणी मुख्यत: बाबलच्या पुराणकथेच्या पायावर झालेली होती.

एका मूळ भाषेच्या या संकल्पनेने भारताच्या सांस्कृतिक इतिहासाचेही वेगळेच आकलन उभे केले. ग्रीक भाषा बोलणाऱ्यांचा ग्रीस देश आणि संस्कृत भाषेतली वेदसूक्ते रचणारांचा भारत देश यांच्यात हजारो किलोमीटरचे अंतर आहे, यावरून अनुमान निघाले की कल्पित मूळभाषा बोलणाऱ्यांचे निरनिराळे गट मूलस्थानापासून फार पूर्वी बाहेर पडले. त्यातल्या भारतात आलेल्या गटाचे नाव वेदसूक्तांत उल्लेख असलेले 'आर्य' असे मानले गेले. ''आर्य आक्रमकांनी'' भारतात आणलेली वेदांची संस्कृत भाषा उत्तर भारतातल्या भाषाबोलींची 'मूळभाषा' असे भाषाविज्ञानात नमूद झाले (टर्नर १९७३:ix)

**संदर्भ आणि टीपा**

टर्नर, आर.एल. (१९७३). ए कंपॅरेटिव्ह डिक्शनरी ऑफ दि इंडो-आर्यन लँग्वेजेस., ऑक्सफर्ड युनिव्हर्सिटी प्रेस, लंडन.

माहुलकर, दिनेश द. (२०००). वृद्धिः :... राज्य मराठी विकास संस्था, मुंबई (बाबल या हिब्रू शब्दाचा इंग्रजीतला सध्याचा उच्चार 'बेबल' असा आहे.)

रोझेनबर्ग, डोना (१९९२), वर्ल्ड मिथॉलॉजी. नॅशनल टेक्स्टबुक कंपनी, इलिनॉय, यूएसए., (हा उतारा इंग्रजीतून घेतला असल्यामुळे शहराचे नाव 'बाबिलोन' असे आले आहे. मूळ अक्कद/सुमेरियन भाषेत ते वेगळे असेल आणि त्याचा अर्थ त्या भाषेत 'थोर देवांचे मंदिर' असा असावा.)

■

374, सिंध सोसायटी, पुणे 411 007. दूरध्वनी 25883187





अनुक्रमणिका

# व्यूहभाषा

द. भि. कुलकर्णी

: १ :

## गद्य, पद्य आणि काव्य

व्यवहारात आपण गद्यात बोलत असतो. ही गद्य भाषा आघातप्रधान असते; म्हणजे शब्दांतील सगळीच अक्षरे आपण सारख्या वजनाने उच्चारित नसतो. काही अक्षरांवर जादा जोर देतो, काही अक्षरांवर जरा कमी जोर देतो; तर काही अक्षरे खूपच कमी जोर देऊन उच्चारतो. लहानपणापासून ऐकून ऐकून आपण गद्याच्या या भाषिक लकबा आत्मसात करतो. मातृभाषेव्यतिरिक्त अन्य भाषेत आपण बोलतो तेव्हा हे आघातभेद आपण नीट सांभाळू शकत नाही; व तेवढ्यावरूनही ऐकणारा 'ही याची मातृभाषा नाही' हे ताडतो. अशा आघातभंगामुळे सहसा अर्थविपर्यास होत नाही; पण कधी कधी भावविपर्यास मात्र होऊ शकतो. एखादी भाषा तिच्या प्रमाण / रूढ आघातांसह ऐकणे याचा जसा एक सांस्कृतिक आनंद असतो तद्वत एखादी भाषा भिन्न/व्यक्तिनिष्ठ आघातांसह ऐकणे हाही एक श्रावणिक आनंद असतोच.

हा प्रकार बोलीबाबत अधिक घडतो.

गोमंतकी, कोकणी, कोल्हापुरी, मावळी, खानदेशी, मराठवाडी, वऱ्हाडी एवढ्याच मराठीच्या बोली नाहीत; तर या प्रत्येक बोलीच्या बोलीही आहेत; त्यात धर्म, वर्ण, जात, व्यवसाय, वर्ग आणि लिंग यांच्या अनुषंगाने विभिन्न छटा मिसळल्या आहेत. त्या ऐकण्यात श्रावणिक आनंदही असतो, सांस्कृतिक आनंदही असतो. त्या ऐकायच्याच असतात; वाचून त्यांच्या पृथगात्मकतेचा प्रत्यय कधीच येत नाही. कसा येईल ? त्या गद्याप्रमाणे निव्वळ आघातप्रधान नसतात; त्यांत अनियमित आवर्तनेही असतात. आवर्तन म्हणजे उच्चारसमूहाचा एक विवक्षित (प्रगृह्य) कालभार; त्याची पुनरावृत्ती. म्हणून तर एका ओळीचे पद्य कधीही नसते; कारण तिथे पुनरावृत्ती नसते. जेव्हा ही पुनरावृत्ती नियमित, नियत असते तेव्हा ते पद्य; जेव्हा ती स्वच्छंद असते तेव्हा ते सताल गद्य; जेव्हा अशी कालभारात्मक पुनरावृत्ती अजिबात नसते तेव्हा ते

शुद्ध गद्य. शास्त्रीय विषयावरील लेखन असे शुद्ध गद्य असते.

बोली सताल गद्यामध्ये प्रकटत असते; म्हणून तर गद्य भाषेपेक्षा तिच्यात श्रवणसापेक्ष गुण अधिक असतात; म्हणून तर ती केवळ वाचायची नसते, सरळ ऐकायची असते.

खरे तर 'बोली सताल गद्यामध्ये प्रकटत असते' हे म्हणणेही काही खरे नाही.

बोली हे भाषासंस्थेचे आद्य रूप आहे. आघात, आवर्तन आणि गेयता हे भाषासंस्थेचे तीनही गुण तिच्यात एकवटलेले असतात. यापैकी आघात या गुणाचा विकास करून शुद्ध गद्य, आवर्तन या गुणाचा विकास करून शुद्ध पद्य व लय या गुणाचा विकास करून शुद्ध संगीत प्रकटत असते. म्हणूनच, बोली भाषासंस्थेच्या केंद्रस्थानी, तर संगीत तिच्या सीमास्थानी असते. बोली हे भाषासंस्थेचे मूलस्थान आहे. हे जसे खरे तसेच आघात, आवर्तन आणि गेयता यांचे पुरेसे विकसन बोलीत होत नसते हेही तितकेच खरे आहे; गद्य, पद्य आणि संगीत यांत त्या त्या गुणाचे पूर्ण विकसन पाहावयास मिळते व म्हणून त्या त्या संदर्भात गद्य, पद्य आणि संगीत ही भाषिक रूपे/ध्वनिरूपे बोलीपेक्षा श्रेष्ठ आहेत, हेही तितकेच खरे आहे. बीजरूपाला आद्यत्वाचा मान असेल तर विकसित रूपाला पूर्णत्वाचा सन्मान आहे. ज्ञानेश्वरीसारख्या ओवीमय ग्रंथामध्ये हे तीनही गुण एकवटलेले आहेत.

बोली आणि भाषा यांच्यातील आणखी एक भेद आपण लक्षात घेत नाही: उच्चारसापेक्षतेने भाषेचा मूळ घटक 'शब्द' असतो; तर बोलीचा मूळ घटक 'वाक्य' असतो. आणखी नेमकेपणाने बोलायचे तर श्रवणसापेक्षतेने बोली वाक्यप्रधान असते; भाषा शब्दप्रधान असते. रूपवाणीवरील निवेदिकेचे बोलणे व कास्तकाराचे बोलणे ऐकले म्हणजे हा भेद चटकन लक्षात येतो; निवेदिकेचा प्रत्येक शब्द विभक्तपणे आपणांस जाणवतो तर कास्तकाराची वाक्ये.

वाङ्मयकृतीची भाषा गद्य, पद्य, बोलीरूप कशीही असू शकते; या प्रत्येक रूपाचे बळ वाङ्मयकृती आत्मसात करीत असते; पण अंतिमत: तिची भाषा या साऱ्यांहून वेगळीच असते. ती अर्थव्यूहांची भाषा असते. शब्द, वाक्य, आघात, आवर्तन, नाद, अर्थ, साहचर्य, मूल्य, गेयता इत्यादी अनेक घटकांतून जो अर्थ, जे भाव आणि जे परिणाम भाषा साधत असते त्यापेक्षा अधिक आशय हे अर्थव्यूह वाङ्मयकृतीतून आविष्कृत करीत असतात. सूक्ष्म आणि विशाल अर्थव्यूह निर्माण करणे हे वाङ्मयकृतीचे व ते जाणवणे हे आस्वादाचे साफल्य असते. हे अर्थव्यूह आकृतिरूप वा स्थिर नसतात तर गतिरूप व परिवर्तनशील असतात – म्हणूनच आस्वादकागणिक त्यांचे स्वरूप बदलत असते.

गद्य भाषा कळते; पद्य भाषा कळते; बोली कळते; पण वाङ्मयाची ही व्यूहभाषा आपल्याला कळते का ?

: २ :

वाङ्मयकृतीमध्ये अर्थाचे व्यूह असतात, वाङ्मयकृतीची भाषा मूलतः आणि अंतिमतः व्यूहांची भाषा असते हे बोलणे अलंकारिक, काव्यमय, लाक्षणिक आहे असे प्रारंभी आपणांस वाटते; ते खरे नाही. हे बोलणे वाच्यार्थयुक्त व शास्त्रीय आहे; 'व्यूह' ही पारिभाषिक संज्ञा आहे. हे अर्थव्यूह इंद्रियगोचर नसतात; मानसगोचर असतात.

दुसरा गैरसमज आपला 'व्यूह' या संज्ञेसंबंधी होऊ शकतो. व्यूह हा शब्द व्यवहारात व विविध शास्त्रांमध्ये वापरला जातो. तशा प्रसंगी त्रिकोण, चौकोन, बंदिश असा त्यांचा इंद्रियगोचर अर्थ आपणांस अभिप्रेत असतो. 'वाङ्मयकृतीत व्यूह असतात' असे कोणी म्हटले की आपल्याला वाटते, हा आकृतिवादी आहे.

'व्यूह' ही एक प्रकारची आकृती असते; पण ती बाह्यरेषांनी सिद्ध झालेली पोकळ आकृती नसते. आपल्या प्रयोजनासाठी आशयाला लाभलेला तो त्याचा व्यवच्छेदक धर्म असतो. वापरणाऱ्याने आपल्या प्रयोजनानुसार लोहाला विशिष्ट आकार दिला की त्याचा सुरा तयार होतो; किंवा शल्यविशारदाचे उपकरण तयार होते. म्हणजे आकार प्रयोजनपूर्ण व आशयसंबद्ध असतो – तो आशयाशी एकरूप झालेला असतो. आशय आणि आकार यांचे विभक्तिकरण केवळ विश्लेषणात्मक व संकल्पनात्मक असते.

मुख्य म्हणजे वाङ्मयकृतीत जे व्यूह असतात ते अर्थाचे व्यूह असतात आणि ते जिवंत असतात. जिवंत म्हणजे काय ? – तर ते निर्माण होतात, वाढतात, त्यांच्यातून दुसरे व्यूह जन्मास येतात व कालान्तराने मूळ व्यूह क्षीण होतात वा नष्टही होतात; या व्यूहांचा एकमेकांशी जन्यजनक संबंध असतो व त्यांची विभिन्न कुळेही असतात हे बोलणेही वाच्यार्थानेच घ्यायचे आहे.

हे व्यूह स्वतः अर्थाचे बनलेले असतात आणि त्यांचे आपण ग्रहण केले की ते स्वतःतील अर्थ तर प्रक्षेपित करतातच; वर सौंदर्य, विस्मय, अनुभवसमृद्धी, आनंद यांचीही निर्मिती ते आपल्या मनात करतात. – एरव्ही असे आणि इतके कधी घडत नसते.

महाकाव्य, कादंबरी अशा दीर्घ वाङ्मयकृतींतील अर्थव्यूह दाखवून द्यायला तशीच दीर्घ समीक्षा लिहावी लागते; भावकाव्यासारख्या लहानसर वाङ्मयकृतींतील अर्थव्यूह दाखवून देणे तुलनेने सोपे असते :

'सुखाचे सोबती' या मथळ्याची एक कविता आहे; ती अशी :

सुखाचे सोबती
दु:खातही राहो;
कोसळो हे नभ
भिंती उभ्या राहो

आपलेपणाने
हात हाती आले
शिंपल्यांत कैसे
मोती गोळा झाले ?
अंतापावेतो हे
हात हाती राहो

गगनाच्या विटा
मोजणारे नर;
येथवरी आलो
त्यांच्या शब्दांवर

विटेवरी माथा
पाय हाती राहो;

सुखाचे सोबती
दु:खातही राहो

आता पाहा, या कवितेतील शब्दांचा आणि वाक्याचा साधासरळ वाच्यार्थ घेतला तर आपल्याला ही एक साधीसरळ भाबडी भावना प्रकट करणारी कविता वाटते. 'जग हे सुखाचे दिल्या घेतल्याचे' असते; तसे माझ्या आप्तमित्रांबाबत न घडो. दैवी प्रकोप झाला तरी त्यांचे माझ्यावरील प्रेम अबाधित राहो; त्यांचे हे प्रेम अखेरपावेतो असेच राहो. हे माझे आप्तमित्र आकाशाएवढे आहेत. त्यांच्या प्रेमाच्या भरवशावर मी इतके आयुष्य सुखात काढले; आता यापुढे ईशचिंतनात माझे आयुष्य व्यतीत होवो.

ठीक आहे ? - पण असा अर्थ जाणवतानाच आपणांस हेही जाणवते की या कवितेत 'भिंती', 'शिंपले', 'वीट' असे फारच गद्य, रुक्ष शब्द कवीने वापरले आहेत. दुसरा एखादा कवी असता तर त्याने 'तट', 'शुक्ती', 'इष्टिका' असे भारदस्त शब्द नसते वापरले ? किंवा 'सेतू', 'सोपान', 'मौक्तिक' असे ? शिवाय त्याने आपल्या

कवितेत छानपैकी नादमधुरताही आणली असती; ही कविता किती कोरडी, नाही ?

असे आपल्याला वाटले हे बरेच झाले; त्यामुळेच तर 'भिंती', 'विटा' आणि 'वीट' या गद्य शब्दांकडे आपण टवकारून पाहिले आणि एकदम या कवितेतील अर्थव्यूह आपल्याला जाणवायला लागले.

या भिंती आप्तमित्रांच्या प्रेमाच्या नाहीत. जे गगनाचा (म्हणजे जीवनरहस्याचा) वेध घेऊ शकतात त्यांच्या शब्दांच्या (प्रतीतिपूर्ण उपदेशाच्या) भिंती आहेत; मग आभाळ कोसळले (नैसर्गिक आपत्ती आल्या) तरी त्या भिंती कोसळतीलच कशा ? – आणि ती वीट कोणती ? या भिंतीचीच. जिच्यात जीवनरहस्य साठविले आहे अशी. पुंडलिकाने जी वीट भिर्कावली आणि ज्या विटेवर विठ्ठल युगे अठ्ठावीस उभा राहिला ती हीच तर गगनाची वीट आहे. हे गगनाच्या विटा मोजणारे नर कोण ? आपले भाबडे आप्तमित्र नव्हते; संत – संतच. आता 'सुखाचे सोबती' या शब्दांचा अर्थही कळला. 'केवळ माझ्या सुखाच्या काळातच मला साथ देणारे आप्तमित्र' असा त्यांचा अर्थ नाही तर 'ज्यांच्या सहवासात मला सुख मिळते, असे गगनाच्या विटा मोजणारे नर – साक्षात्कारी, संत' असा त्या शब्दांचा अर्थ आहे. अशा नरवरांचे प्रेम मला – आणि सगळ्यांना – आपल्या आणि विश्वाच्या अंतापर्यंत - लाभो. अशा साधुपुरुषांना मी शरण जातो.

आता या कवितेत साधू-संत-साक्षात्कारी यांचा प्रत्यक्ष उल्लेख नाही हे तर उघडच आहे; मग काय हा आपला कल्पनाविलास आहे ? नाही. कवितेतील अर्थव्यूहांतून हा अर्थ आपल्याला जाणवला आहे. भिंत-विटा-वीट, नभ-गगन, हात-माथा-पाय या शब्दांतील अर्थांचे व्यूह तयार झाले आणि त्या व्यूहप्रत्ययाने आपण चकित, प्रमुदित आणि अनुभवसमृद्ध झालो.

हे अर्थव्यूहांचे दिग्दर्शन आहे; कवितेचे संपूर्ण विश्लेषण किंवा रहस्योद्घाटन नाही. असे अर्थव्यूह, अशी अर्थव्यूहांची भाषा कुठल्याही उत्तम वाङ्मयकृतीमध्ये पाहावयास मिळते. ज्ञानेश्वर, तुकाराम, रामदास, गडकरी, बेडेकर, मर्ढेकर, जीए, रेगे, शेळके, नेमाडे यांच्या वाङ्मयकृती या अशा अर्थव्यूहांच्या भाषेतील वाङ्मयकृती आहेत. त्यांचा या दृष्टीने अभ्यास केला तर विविध अर्थव्यूहांतील प्रतीतिभेद जाणवून एक नवीन व अधिक अर्थपूर्ण परिभाषा सिद्ध होऊ शकेल.

■

'वसुधा' ई-004, डीएसके विश्व, ऑफ सिंहगड रोड, धायरी, पुणे 411 041.
दूरध्वनी (020) 24380894








# ‘‘दीनानाथ’’ : शब्द, रूप, अर्थ

दा. ल. अडोणी

इ.स. १९००मध्ये किंवा थोडे मागे-पुढे महाराष्ट्रात जन्मलेल्या काही मुलांचे नाव ‘दीनानाथ’ असे ठेवले होते. त्यांतील निदान दोघे आपल्या अंगभूत कलागुणांमुळे पुढे प्रसिद्ध झाले. मास्टर दीनानाथ मंगेशकर व दीनानाथ दलाल. नामकरणप्रसंगी मुलाला किंवा मुलीला जे नाव देतात - त्याचे - तिचे जे नाव ठेवतात तो होतो ‘साक्षात् संकेत’. कुटुंबीय, नातलग, शेजारीपाजारी यांच्या लेखी ‘दीनानाथ’ म्हणजे हे नाव धारण करणारा तो माणूस. ते संयुक्त नाम असले तरी घटक पदांचा अर्थ येथे अप्रस्तुत, गैरलागू ठरतो. विशेषनामाचा पदशः अर्थ लक्षात घ्यायचा नसतो. ‘नाव सोनूबाई व हाती कथलाचा वाळा’ अथवा ‘अमरसिंग तो मर गए, मांगे लक्ष्मी भीख’ या लोकोक्तीत हाच लोकाचार विरोधाने सांगितला आहे.

महाभाष्यकार पतंजलीने वाक्यात किंवा व्यवहारात शब्दाचा वापर (मुख्यतः) चार प्रकारांनी कसा होतो, हे सोदाहरण सांगितले आहे. ‘शब्दांना चतुष्टयी प्रवृत्तिः’। तद् यथा - गौः शुक्लः चलो डित्थः । जाति-व्यक्ति-गुण-क्रियावाचकाः शब्दाः । ‘डित्थ (नावाचा हा) पांढरा बैल चालतो.’ चौकस शेजाऱ्याने विचारले, ‘‘अहो ! ‘डित्थ’ म्हणजे काय ?’’ (तो शब्दाचा अर्थ विचारत असावा.) शेतकरी उत्तरला, ‘‘हा मी नाव ठेवलेला (ढवळा) बैल. बस हाच अर्थ. डित्थ शब्दाला दुसरा काही अर्थ असेल तर तो मला माहीत नाही, व त्याचा येथे काही संबंधही नाही.’’

मात्र ‘दीनानाथ’ केवळ विशेषनाम नाही. विशेषण-गुणबोधक शब्द म्हणूनही तो योजतात. त्याचाच येथे मुख्यतः विचार करायचा आहे. अशा वेळी मात्र तो जोड-संयुक्त शब्द असल्यामुळे त्यातील पदांकडे रूपार्थदृष्ट्या ध्यान देणे अगत्याचे ठरते.

प्रस्तुत शब्द असलेले पुढील मनाचे श्लोक पाहा :

दिनानाथ हा राम कोदंडधारी ।
पुढें देखता काळ पोटीं थरारी ॥२८॥
दिनानाथ हे तोडरीं ब्रीद गाजे ।
मना सज्जना राघवीं वस्ति कीजे ॥४२॥

बहुतेकांच्या ऐकण्या-वाचनात आलेले हे उल्लेख कित्येकांना तर खचित मुखोद्गतही असतील. या रचनांचा सुमारे तीनशे वर्षांपासून तरी मराठी मनावर प्रभाव पडलेला दिसून येतो. प्रस्तुत शब्दाने इतरांच्या मनात उत्पन्न होणारा आशय समजून घ्यावा या कुतूहलाने अनेक परिचितांना (त्यांतील बहुतेक पदवीधर स्त्री-पुरुष व २-३ हिन्दीभाषी होते) 'दीनानाथ' शब्दाचा अर्थ विचारला. 'गरिबांचा, पीडित लोकांचा स्वामी, त्यांचा त्राता, रक्षणकर्ता, उद्धार करणारा, (पर्यायाने ईश्वर)' असा उत्तरांचा सूर होता. हा अर्थ वरील उल्लेखांच्या संदर्भात जुळणारा आहे, हे खास. उत्तरदात्यांनी 'दीनानाथ' हा शब्द समस्त-सामासिक कल्पिलेला दिसतो.

पण समासात तर प्रायः विभक्तिप्रत्ययांचाच नव्हे, तर तो प्रत्यय लागण्यापूर्वी होणाऱ्या 'सामान्य रूपांचा'ही लोप होत असतो. उदा० 'दीनबंधु' (अॅड्र्युज), दीनदयाळ (उपाध्याय). येथे तर 'दीन'चे 'दीना' असे 'सामान्यरूप' दिसते. हे रूप अनुचित-अविहित, गैरलागू ठरते. वर समासात 'प्राय:' म्हटले खरे, तरीही 'आत्मनेपद, परस्मैपद' या समस्त रूपांत चतुर्थीचा प्रत्यय (आगंतुकी करून !) आलेला दिसतोच. यांखेरीज 'धनंजय, प्रियंवदा, मृत्युंजय, रात्रिंचर, विहंगगम', जोडीला 'मनसिज, सरसिज, युधिष्ठिर' असे द्वितीया किंवा सप्तमी (विभक्ती-)चे प्रत्यय असलेले शब्द भाषेत रूढ आहेत. यांच्या संबंधात हे मात्र ध्यानात धरले पाहिजे की त्यांचे प्रथम पद सविभक्त (विभक्तीत) असून दुसरे पद धातुसाधित - क्रियारूपाचा (अपूर्ण) अवशेष आहे. 'दिनानाथ' शब्दासंबंधात तसे काही नाही. त्यातील पहिले पद विशेषण असून दुसरे नाम असे 'कल्पितात' गृहीत धरतात. ते कितपत योग्य हे पुढे उलगडेल.

वरील उदाहरणे 'अलुक्' समासाची आहेत. 'लुक्' ही पाणिनीय पारिभाषिक संज्ञा असून तिचा अर्थ 'लोप' असा आहे. विभक्ति-लोप होत नाही म्हणून हा 'अ-लुक्' समास. अशा समासाला मराठीत 'अलोपी' समास म्हणणे कितपत उचित व विहित, याचा मराठीतील व्याकरणविज्ञांनी, विशेषज्ञांनी विचार करावा.

मागे उद्धृत केलेल्या 'मनाच्या श्लोकां'तील 'दिनानाथ' शब्दाचे लेखन-मुद्रण सलग (अखंड) केलेले सर्वत्र आढळते. सर्वांनी अर्थ संदर्भात सुसंगतच लावला हे वर मान्य केलेच आहे. त्या स्थळी 'दिना नाथ' असे वेगळे (तोडून) शब्द छापले तर ते इष्टार्थक व उचित होईल. 'दिनां' असे केल्यास हे अनेकार्थक रूप इष्टतर. याचा विचार व्हावा.

एका दीनानाथाने जगन्नाथाची कळकळीने केलेली आळवणी आता ऐकू या :

''हर त्वं संसारं द्रुततरमसारं सुरपते ।

हर त्वं पापानां विततिमपरां यादवपते ।
अहो दीनानाथं निहितमचलं पातुमनिशम् ।
जगन्नाथस्वामी नयनपथगामी भवतु मे ॥''

(चरण २, वितति = वेल. चरण ३, येथील 'अहो' हे अव्यय संबोधनवाचक वाटणे संभवते. पण ते तसे नसून येथे दुखःद्योतक दिसते. दुसरे, 'दीनानाथं' ही (कर्मणि) द्वितीया आहे हे लक्षात घ्यावे, 'निहित-अनिशम्' (आत्म-) रक्षणाचा-उद्धाराचा ठाम निश्चय करून रात्रंदिवस बसलेला). या संस्कृत श्लोकाचा अनुवाद काहीसा असा :

निवारी संसारा लवकर आसारा, सुरवरा
विनाशी पापांची विषय-विषवेली यदुवरा ।
मला दीनानाथा सतत कटिबद्धोद्धत करा
जगन्नाथस्वामी नयनपथि येवो मम बरा ॥

चरण ३ (हे जगन्नाथा !) नेहमी निश्चय केलेल्या या दीन व अनाथ अशा पामराला वर उचला, उन्नत करा, असा भावार्थ.

याप्रमाणे दीन + अनाथ या दोन विशेषणांचा संधी झालेला हा शब्द आहे. मनाचे श्लोकांतील ('अनाथ' असून झालेल्या) 'दिना नाथां'ला अभिवादन करून हे वाढलेले विवरण संपवितो.

*[टीप : 'मनाचे श्लोक'मधील दोन उल्लेखांच्या आधी व नंतर 'संपूर्ण चातुर्मास' या धार्मिक पुस्तकातून 'भीमरूपी (मारुति) स्तोत्रातील पाचवी ओळ व 'श्रीव्यंकटेश स्तोत्रातील ओवी ९, हे दोन जास्तीचे 'दीनानाथा' असे उल्लेख घेतले होते, नंतर ते वगळले. कारण हभप. ल. रा. पांगारकर संपादित 'भक्तिमार्ग प्रदीप' या ग्रंथात 'दीननाथा' असा योग्य सुविहित पाठ आढळला. पांगारकरांनी संपादिलेली पहिली आवृत्ती इ.स. १९०४मध्ये प्रकाशित झाली होती. इतर संपादकांनी आपापल्या वृत्ती + रुचीप्रमाणे आपण संपादित केलेल्या पुस्तकात काही उणे = अधिक केले असावे.*

*ओवी व अनुष्टुप हे छंद बरेचसे शिथिल आहेत. 'मनाच्या श्लोका'तील 'दिनानाथ' वृत्तसुखार्थ'आहे हे उघड आहे.]*

■

स-61, प्राध्यापक निवास, विश्वविद्यालय परिसर, सागर 470 003 (म.प्र.)

# रुचेची ना, पटेची ना !

प्र.ना. परांजपे

छापील मजकूर वाचताना दाताखाली खडा यावा असे काही वेळा होते. सकाळी वृत्तपत्र वाचताना हा अनुभव विशेषत्वाने येतो. वृत्तपत्रातील मजकूर लिहिताना व छापताना काळाबरोबर शर्यत असते असे म्हणतात. पण अग्रलेखाचे पान व त्या पानाच्या समोरचे पान यांच्या बाबतीत अधिक सवड मिळू शकते; त्यामुळे शंका असतील तर संदर्भ साहित्य पाहाता येते; सहकाऱ्यांना सल्ला विचारता येऊ शकतो; वेळप्रसंगी दूरध्वनीवरून तज्ज्ञांचे मतही घेता येते. पण हे सारे केव्हा ? छापले जाणारे लिखाण जास्तीत जास्त निर्दोष असावे अशी आच असेल तेव्हा ! काहीही छापले तरी वाचक तक्रार करणार नसतील किंवा केल्या जाणाऱ्या तक्रारीची दखल घेतली जाणार नसेल तर ? हळूहळू लिहिणाऱ्यांची भीड चेपत जाते, वाचणाऱ्यांची भाषिक संवेदनशीलता बोथट होत जाते आणि भाषेचा काटेकोरपणा कमी होत जाऊन भाषा नि:सत्व व ढिसाळ बनते.

अलिकडेच एका दैनिकातील अग्रलेखाचे पान व त्या समोरील पान यांच्यावरच्या पाच लेखांतील काही वाक्यांनी व वाक्यखंडांनी मला अस्वस्थ केले. ती वाक्ये व वाक्यखंड पुढे देत आहे. त्यांच्यावरील माझी प्रतिक्रियाही देत आहे. त्यांच्याबद्दल 'भाषा आणि जीवन'च्या वाचकांनी प्रतिक्रिया कळली तर या संबंधीचे एखादे सदर नियमितपणे सुरू करण्याचा विचार करता येईल.

- ज्या समाजगटांनी आपल्याला मते दिली त्या सर्वांना सत्तेत सहभागी होण्याची संधी मिळाली आहे.

– संधी 'मिळाली' की 'दिली' ? 'आपल्याला' की 'त्यांना' ? पुढीलपैकी एखाद्या पद्धतीने हे वाक्य लिहिले तर ते अधिक निर्दोष व अर्थवाही होईल का ?

(अ) ज्या समाजगटांनी आपल्याला मते दिली त्या सर्वांना सत्तेत सहभागी होण्याची संधी त्यांनी दिली.

(आ) ... त्या सर्वांना त्यांनी सत्तेत सहभागी होण्याची संधी दिली.

(इ) ... त्या सर्वांना त्यांनी सत्तेत सहभागी करून घेतले / भागीदार करून घेतले.

(उ) ... त्या सर्वांना त्यांनी सत्तेत भागीदारी दिली.

(ए) ... त्या सर्वांना त्यांनी सत्तेची संधी दिली.

● निवडणुकीच्या काळात मायावतींनी कोणताही जाहीरनामा सादर केला नव्हता, मात्र 'गुंडाराज' दूर करण्याबद्दल बोलत असत.

– या वाक्याच्या उत्तरार्धातील क्रियापदास कर्त्याची आवश्यकता आहे.
... त्या बोलत असत.

● यातून मार्ग काढण्यासाठी पाण्यावर सध्या पाण्यासारखा पैसा खर्च केला आहे.

– या वाक्यातील 'केला आहे' या क्रियापदाचा कर्ताच हरवला आहे ! त्यामुळे येथे ''खर्च होत आहे'' किंवा ''खर्च केला जात आहे'' असे क्रियापद हवे.

● संबंधित गावेच पाण्याचा वापराविषयी, पीकपद्धतीविषयी निर्णय घेतात. व्यवस्थेविषयी त्यांचा विश्वास दिवसेंदिवस दृढ होत चालला आहे.

– 'पाण्याचा' ऐवजी 'पाण्याच्या' हवे.

● एकच मोठे धरण बांधून त्यावर केंद्रित संपूर्ण जलव्यवस्थापन म्हणजे नागरीकरणाला प्रोत्साहन देणारे ठरते.

– या वाक्यातील 'म्हणजे' आणि 'देणारे' या दोन शब्दांपैकी एक शब्द वगळायला हवा.

● त्यामुळे जलव्यवस्थापनाचे असे 'पॉकेट' निर्माण न होता सर्वत्र त्याचा प्रसार होईल.

– (अ) या वाक्यात 'पॉकेट'ऐवजी 'बेट' हा मराठी शब्द नाही का वापरता येणार ?
(आ) 'सर्वत्र' हे क्रियाविशेषण क्रियापदाच्या जवळ (''प्रसार सर्वत्र होईल'') वापरले तर अर्थ अधिक सुलभतेने व्यक्त होईल.

● पाणी हे समाजाचा मालकीचे, असे एकीकडे म्हणत असताना जागतिक बँक मात्र पाण्याच्या क्षेत्रात खासगीकरण आणण्यासाठी प्रयत्न करीत आहे.

– 'समाजाचा' ऐवजी 'समाजाच्या' असे म्हणायला हवे.

- खोरेनिहाय मंडळे सुरू केले जातील.

– 'मंडळे सुरू केली जातील' असे हवे.

- पन्नाशीच्या घरातील दोन 'चैतन्यशाली' व्यक्ती अध्यक्षपदाच्या मुख्य शर्यतीत होते.

– या वाक्यात कर्ता ('व्यक्ती') आणि क्रियापद ('होते') यांच्यात अनुबंध नाही. एकतर क्रियापद 'होत्या' असे करायला हवे किंवा कर्ता 'उमेदवार', 'चेहरे' यापैकी एखादा हवा.

- सामाजिक सुरक्षितता आणि कल्याणासाठी आश्वासनांची खैरात त्यांनी दिली.

– खैरात 'देतात' की 'करतात' ?

- भारतीय राज्यघटनेनुसार राज्याचे तिन्ही प्रमुख स्तंभ स्वतंत्र असली तरीही त्यांचा आपसातील ताळमेळ 'चेक' आणि 'बॅलेन्स' या तत्त्वानुसार कार्यवाहीत असावा.

– 'तिन्ही प्रमुख स्तंभ असली तरीही ...' हे चूकच आहे. 'असली'च्या जागी 'असले' हे रूप हवे. 'बॅलेन्स' ऐवजी 'बॅलन्स' हवे.

- न्यायाधीशांच्या नियुक्त्या करताना हस्तक्षेप नसावा, न्यायदानाच्या कामासाठी पुरेसा निधी उपलब्ध करून द्यावा, निधीच्या खर्चावरील नियंत्रण न्याय संस्थेचे असावे, न्यायमूर्तींच्या कामातील गैरप्रकारांबाबत शिस्तभंगाच्या कारवाईचे अधिकार न्याय संस्थेकडेच राहतील, अशा महत्त्वाच्या तरतुदी न्यायालयीन व स्वतंत्र अर्थपूर्ण अस्तित्वाच्या संदर्भात घटनेत नमूद आहेत.

– (अ) यात 'नसावा', 'द्यावा', 'असावे' अशा समांतर क्रियापदांच्या नंतर 'राहातील' हे वेगळेच क्रियापद कसे चालेल ? त्याऐवजी ''राहावे(त)'' असे क्रियापद यायला हवे.

(आ) 'न्यायालयीन'ऐवजी 'न्यायालयांच्या' किंवा 'न्यायव्यवस्थेच्या' असे पद हवे आणि नंतरचे 'व' हे अव्यय वगळायला हवे.

(इ) 'अस्तित्वाच्या संदर्भात'चा अर्थ अतिव्याप्त होतो. त्याऐवजी 'अस्तित्वासाठी' हे अधिक निश्चित अर्थाचे पद हवे.

(उ) - 'न्याय संस्था' हे सामासिक पद असल्याने ते 'न्यायसंस्था' असे जोडून लिहिणे चांगले.





अनुक्रमणिका

- जनतेला उत्तर न देण्याची मुभा असणे, न्यायाधीशांवर खटले भरण्यातून सूट मिळणे, न्यायालयाची बदनामी केल्याचे अधिकार असणे, अशा अर्थाने न्यायालयीन स्वातंत्र्य संकल्पनेचा अर्थ विशद केला जातो, तो कितपत योग्य आहे ?

– 'न्यायालयाची बदनामी केल्याचे अधिकार असणे' याचा अर्थ अभिप्रेत अर्थाच्या उलटच होतो. 'न्यायालयाची बदनामी हा गुन्हा असणे' असे म्हणणे आवश्यक आहे.

- स्वायत्तता व स्वातंत्र्याचा भाग म्हणून न्यायाधीशांच्या नेमणुका करताना न्याय-पालिकेतील उच्च न्यायाधीशांचे नेतृत्व व कर्तृत्वच केंद्रस्थानी ठेवले गेले; परिणामतः गुणवत्ता व आदर्श मूल्यांचे निकष बाजूला सारून न्यायाधीश निवड प्रक्रियेत आपल्या गटातली, आपल्या जवळची आणि आपल्या ओळखीच्या चेहऱ्याची व्यक्ती नियुक्त केली जाते.

– (अ) हे वाक्य किती गोंधळलेले आहे ! काही लहान वाक्यांत त्याची विभागणी करणे आवश्यक आहे.

(आ) 'न्यायाधीश निवड प्रक्रियेत' असे बोजड सामासिक पद तयार करण्याऐवजी 'न्यायाधीशांच्या निवडीच्या प्रक्रियेत' अशी त्याची फोड केल्यास त्यात 'मराठीपण' येईल व ते सोपेही होईल.

(इ) 'उच्च न्यायाधीश' की 'उच्च न्यायालयातील न्यायाधीश' ?

- म्हणूनच न्याय संस्था अतिसक्रिय झाल्याने राज्याची इतर स्तंभांवर दुष्परिणाम होईल की काय, अशी भीती वाटू लागली आहे.

– 'राज्याची इतर स्तंभांवर' नव्हे, 'राज्याच्या इतर संस्थांवर' !

- म्हणून न्यायाधीशांनाही चौकशीच्या कक्षेत आणून जनताभिमुख न्यायनिवाडे देण्याच्या संदर्भात उत्तरदायित्वाचा जाब विचारण्याचे स्वातंत्र्य जनतेला असले पाहिजे.

– हे वाक्य गोंधळलेले आहे ! संकल्पना इंग्रजीत आणि शब्द मात्र मराठी असल्यामुळे असे झाले असावे.

- मात्र, या सर्वांमध्ये करुणानिधी मात्र घट्टपणे पाय रोवून उभे आहेत, एखाद्या ध्रुवाप्रमाणे.

– 'मात्र' या शब्दाची पुनरुक्ती कशाला ?

■

सी-1, सुरजबन सहनिवास, गणेशखिंड मार्ग, पुणे 411 007. दूरध्वनी 25694617

# विद्वत्ता इवल्यांची !

शरदिनी मोहिते

अतिशय उच्च स्वरात आमच्या निमाईबाळानं आपला निर्णय जाहीर केला, तेव्हाचा त्याचा आविर्भाव अगदी पाहण्यासारखा होता... आपलं न ऐकून आईनं आपल्यावर अन्याय केला असं वाटून संतापत, आधी त्यानं आपले कोवळे केस आपल्या कोवळ्या हातांनी उपटून आपला संताप व्यक्त करण्याचा प्रयत्न केला, आणि आपला डावा हात तसाच केसात ठेवत उजवा हात उंच केला. एखाद्या पुढाऱ्याप्रमाणे उंच हाताची तर्जनी उंच करून त्यानं जाहीर केलं, ''बाबाकले ज्यायचं !'' सध्याच्या 'आणि-बाणी'तून सुटण्याचा हा त्याला वाटणारा सर्वोत्तम मार्ग होता... याच्या उलट, जेव्हा बाबांबद्दल तक्रार व्हायची, तेव्हा त्याचा घोष असायचा, ''मम्माकले ज्यायचं !''

त्याच्या समजुतीनुसार हे दोन उत्तम मार्ग, किंवा तोडगे, संकटातून पार करायला अतिशय समर्थ होते. त्याचा असा ठाम विश्वास की 'बाबाकले' किंवा 'मम्माकले' गेलं की प्रश्न सुटलाच !... निमूबाळ जेव्हा असं काही बोलतो, त्यावेळी त्याच्या मुद्रेवर किंवा एकूणच आविर्भावावर श्रद्धायुक्त विश्वासाचा किंवा विश्वासयुक्त श्रद्धेचा म्हणा असा काही विलोभनीय आविष्कार उमटतो, की कधी कधी वाटतं, त्याचं हे रूप पहाण्यासाठी खोटं खोटं का होईना त्याला चिडवावं !

एक साधी, निर्मळ निष्पाप गंमत पहा - चिमुकल्या चंदाराणीनं आपल्या आईला एक गहन प्रश्न विचारला होता, ''आई ग, या देवानं आपल्याला अक्कल का बरं दिली ?'' झालं होतं काय, की सदाशिव पेठेतल्या त्या इटुकल्या वाड्यात राहणाऱ्या चंदाराणीच्या मैत्रीण- ताईला - भानूला एका संध्याकाळी साडी नेसायची लहर आली. आणि तिनं आपल्या आईला चमकती कल्पना साडी नेसवायला लावली. छान सुंदर साडीत नटून ठुमकत भानू लगेच चंदाकडे धावली. इवल्या साडीच्या इवल्या पदराचं टोक चिमटीत धरून तिनं शाळेत शिकवलेल्या नाचाचा नखरा गाण्याच्या साथीनं चंदापुढं उभा केला. चंदाला ती साडी, तो नाच, ते गाणं आणि भानूताईचा थाट... सारंच इतकं आवडलं की ''आई मला पण नेसव ना माझी कल्पना साडी'' म्हणून तिनं हट्ट धरला. चंदाची आई त्या वेळी खरोखरच कामाच्या खूप धांदलीत होती.

संध्याकाळी बरेच पाहुणे येणार होते. त्यांच्यासाठी काही चटकदार खाणं तयार करण्याच्या गडबडीत ती होती. चंदाची समजूत घालण्याचा तिनं प्रयत्न केला, ''अगं, आत्ता या वेळी कशाला हवी साडी ? संध्याकाळ झालीय, थोड्या वेळात जेवून झोपून पण जाशील तू... आता हा बघ किती छान खाऊ केलाय...''

''पण भानूताई नेसलीय ना !''

''नेसली असेल.''

''मला पण नेसायची !''

''तिनं नेसली म्हणजे तूही लगेच नेसायलाच हवी का ?... तुझी तुला काही अक्कल दिलीय का नाही देवानं ?''

चंदाराणी विचारात पडली हे ऐकून. आता काय सांगावं आईला... म्हणजे ती साडी नेसवेल ? मला पण भानूताईसारखं गाणं म्हणायचंय, नाच करायचाय... थोड्या वेळासाठी का होईना आपली छानुली मोरपंखी साडी नेसायची होतीच होती तिला... पण काय सांगावं आईला, हे काही कळेना तिला. चंदा गप्प बसलेली पाहून आई पुन: कामाकडे वळली. अचानक काहीतरी सुचून चंदा आईच्या मागे गेली, आणि आईच्या पदराशी खेळत लडिवाळपणे तिनं आईला विचारलं, ''आई ग ! या देवानं आपल्याला का बरं अक्कल दिली ?... सांग ना !'' आई थक्कच झाली हा प्रश्न ऐकून. आता या पिटुकलीला काय उत्तर द्यायचं कळेना तिला... कारण काही बोललं सांगितलं तरी ती पुन: काही शंका विचारणार, आणि पुन: काहीतरी बोलत रहाणार म्हणून मग तिनं साधा सरळ विचार केला की साडी नेसवून तिला खेळायला पिटाळणं सोपं. म्हणून तिनं चंदाला साडी नेसवली. तेवढ्यात घरी आलेल्या मधुरिकेनं खूष होत चंदाला मिठीच मारली आणि तिचे पापे घेत तिचं आणि तिच्या साडीचं कौतुक तर केलंच, पण नंतर तिला देण्यासाठी आणलेली कॅडबरी तिला आधीच देऊन टाकली...

विकासकडे एकदा त्याच्या भावाचं, सुभाषचं, पत्र आलं. पण सुभाषचं पत्र सुरू व्हायच्या आधी सुभाषच्या नुकतंच लिहायला शिकलेल्या मुलानं-शिरीषनं-विकासच्या मुलीला(सविताला) लिहिलेलं एक छोटं पत्र होतं. त्या एवढ्याशा पत्राचं लेखन करताना त्यानं खूप कष्ट घेतलेले दिसत होते. प्रत्येक अक्षर कोरून लिहायचा प्रयत्न केला होता. सुरुवातीला शिरीषनं सविताला जयहिंद ठोकला होता. 'स.ताईला जयहिंद. मग आम्ही दादाची मॅच पाहिली, आम्ही पार्कमध्ये माकडं पाहिली, कल्पना भेळ खाल्ली' अशा काही त्यांच्या दृष्टीनं महत्त्वाच्या बातम्या देऊन 'सुट्टीत लवकर ये, आपण किल्ला करू' असा बेत जाहीर केला. मग सर्व भावंडांना मित्र-मैत्रिणींना जयहिंद लिहून त्यानं शेवटी कहर केला होता. लिहिलं होतं - 'विकासकाकांना माझा आशीर्वाद !'

अचानक सुचलेल्या कल्पना मुलं बोलून दाखवतात. उत्फुल्ल अनोख्या ढंगात. आणि काही गोष्टी आपल्याला माहीत नसतील असं गृहीत धरून त्या ती आपल्याला समजावून सांगतात. त्या वेळी त्यांची भावना जणू आपण एक महान कर्तव्य करतो आहोत अशीही असते, आणि आपल्याला माहीत असलेल्या ज्ञानाच्या गुपितात आपल्या आवडत्या ताईला म्हणा, आईला म्हणा, आजीला म्हणा, बाबांना... कधीकधी आजोबांनाही म्हणा आपण सामील करून घेतो आहोत अशी कर्तेपणाची सुखद जाणीव त्या कोवळ्या चेहऱ्यांवर झळकत असते !

परवाच्या आलेल्या ideaच्या बिलाच्या वेष्टणावरचं चित्र पाहिल्यावर सगळा खेळ 'मीठ साखर' वगैरे खाणं सोडून आमची निलू बाळी माझ्याजवळ येऊन बसली. माझ्या पुढ्यातल्या मटारच्या शेंगा तिनं बाजूला सारल्या. आणि मला अगदी चिकटून बसत तिनं गंभीरपणे मला ते चित्र दाखवलं. मला म्हणाली, ''हे पहा कोण आहे.''

मी ते चित्र पाहताच तिला म्हणाले, ''अग हा तर कुंभकर्ण आहे. रावणाचा भाऊ...'' तिनं मला जणू बजावत सांगितलं, की ''हा राक्षस आहे !''

मी म्हटलं, ''हो ना. राक्षसच आहे. पण याचं नाव आहे कुंभकर्ण.''

निलू म्हणाली, ''तो असा का पडला आहे ?''

''तो झोपलाय ग !''

''पण तो राक्षस आहे... तुला माहीत आहे का, राक्षस लहान मुलांना पळवून नेतात !''

बाळीचं हे नवं ज्ञान पाहून तिला मी विचारलं, ''कोण म्हणालं असं ?...''

''मला माहिती आहे. सगळ्या पोरांना माहिती आहे...''

''पण तुला कोणी सांगितलं की राक्षस पोरं पळवतात ?''

''बाबानी !''

''अग पण हा चांगला राक्षस आहे. हा काही पोरं पळवणारा राक्षस नाही. हा नुसता झोपतो. झोपतोच झोपतो...''

मग निलू हळूच मला म्हणाली, ''मला राक्षसाची भीती वाटते...''

म्हटलं, ''काही भिऊ नकोस. हा चांगला राक्षस आहे...''

पण ती काही आपलं म्हणणं सोडायला तयार नव्हती. उलट मलाच तिनं सांगितलं, ''तू त्याच्याकडे पाहू नकोस.''

मात्र पुढं बोलताना झाला अर्थाचा व्यत्यास ! तिला म्हणायचं होतं की तुला त्याची भीती वाटेल... प्रत्यक्षात म्हणाली, ''अग त्याला तुझी भीती वाटेल !'' ■

ए-1/4, शरयू, सरितानगरी, फेज-2, सिंहगड मार्ग, पुणे 411030. फोन 24251353

पुस्तक-परीक्षण

# कॉलिंगवुडवर लादलेला मराठी अवतार

प्रशान्त बागड

[परीक्षित पुस्तक : 'कलेची मूलतत्त्वे', आर.जी. कॉलिंगवुड, भाषांतरकार : स.गं. व मिलिंद मालशे, महाराष्ट्र राज्य साहित्य व संस्कृती मंडळ, मुंबई, २००४, पृष्ठे ४०२, किंमत रु. ११५/-]

कला म्हणजे भावनांची अभिव्यक्ती, हे कुणाला माहीत नसतं ? पण एखाद्याने हे सर्वपरिचित सत्यच जर कलेविषयीचा तात्त्विक सिद्धांत म्हणून साग्रसंगीत (किंवा साग्रतत्त्व) सादर केलं तर ? तर आपल्याला नक्कीच वाटेल की सिद्धांतन म्हणजे साध्यासुध्या गोष्टींची मुद्दाम क्लिष्ट भाषेत केलेली चर्चा असते. पण असा सिद्धांत मांडताना त्या मीमांसकाने आग्रहाने असं प्रतिपादन केलं की अभिव्यक्त होताना भावनेचं यथार्थ स्वरूप आपल्याला स्पष्टपणे प्रतीत होतं; तर ? तर ह्या आग्रहातून एक महत्त्वपूर्ण मुद्दा ध्वनित होतो, तो मुद्दा असा की भावनेची अभिव्यक्ती आणि खुद्द भावना ह्या दोन भिन्न गोष्टी नसतात; भावनेचं यथार्थ स्वरूप अभिव्यक्तीतून निष्पन्न होतं.

लेखक माध्यमाचे कानेकोपरे धुंडाळतो, प्रयोग करतो ते अंतिमत: स्वत:च्या भावनांचं रहस्य उकलण्यासाठी. अनभिव्यक्त भावना, अभिव्यक्तीचं माध्यम, अभिव्यक्ती आणि अभिव्यक्त भावनेचं आकलन यांचा जीवश्चकंठश्च संबंध असतो, इतकं सारं सूचित होतं त्या मीमांसकाच्या एका साध्या पण चोख आग्रहातून. तो मीमांसक म्हणजे विसाव्या शतकातील विचक्षण कलातत्त्ववेत्ते आर.जी. कॉलिंगवुड.

कला म्हणजे अभिव्यक्ती वा आविष्कार हा प्रथमदर्शनी अगदी साधासोपा (व म्हणून प्रसंगी दुर्लक्षणीय) वाटेल असा सिद्धांत मांडणारा 'दि प्रिन्सिपल्स ऑफ आर्ट' हा कॉलिंगवुड यांचा ग्रंथ १९३८ साली प्रकाशित झाला. म्हणजे विश्लेषक तत्त्वज्ञानाच्या ऐन धामधुमीत - व बालेकिल्ल्यात (तत्कालीन ऑक्सफर्ड) - आज इंग्रजीभाषिक देशांत 'कॉन्टिनेण्टल तत्त्वज्ञान' म्हणून उल्लेखिल्या (व पुष्कळ अंशी हेटाळल्या) जाणाऱ्या परंपरेशीही सलगी साधणारं कलेचं तत्त्वज्ञान कॉलिंगवुड यांनी मांडलं. दुसऱ्या शब्दांत सांगायचं तर, तत्त्वज्ञानाला भाषिक कलाटणी मिळाल्यानंतर

सत्त्वतावादी तर्कदोषाचं (काही विशिष्ट गुणधर्म वस्तूत असतातच आणि तेच वस्तूचं सत्त्व, गाभा असं मानताना केल्या जाणाऱ्या वैचारिक प्रमादाचं) एक उदाहरण एवढंच मोल लाभेल असा कलाविषयक सिद्धांत कॉलिंगवुड यांनी मांडून ठेवला. गेली कित्येक वर्षे इंग्रजी भाषेत चालणाऱ्या कलातत्त्वज्ञानाच्या मुख्य प्रवाहाने कॉलिंगवुड यांच्या विचारांना अक्षरशः हिणवलेलं आहे. उदाहरणार्थ, कॉलिंगवुड यांनी 'आर्ट' आणि 'क्राफ्ट'मध्ये केलेला प्रसिद्ध (किंवा अतिप्रसिद्ध) फरक. आर्ट, एका विशिष्ट अर्थाने, क्राफ्ट असू शकत नाही, असं कॉलिंगवुडचं म्हणणं. यातलं तथ्य ध्यानात न घेता क्राफ्ट नसलेली एखादी गोष्ट – उदाहरणार्थ, सचिन तेंडुलकरची एखादी उत्कृष्ट खेळी – 'आर्ट ' म्हणून का गणली जाऊ नये, अशा प्रकारच्या तार्किक कुरघोड्या करून कॉलिंगवुडच्या विचारांची दखल घेतली गेली आहे. त्यातच खरी कलाकृती कलावंताच्या डोक्यात असते, जगात नसते; ती केवळ कल्पनाजन्य वा काल्पनिक वस्तू असते; भौतिक कलाकृती ही दुय्यम व बिनमहत्त्वाची चीज असते, असे एक अत्यंत चमत्कारिक आशयसूत्र ह्या ग्रंथात पेरून स्वतः कॉलिंगवुड यांनी आपल्या कलामीमांसेप्रती प्रतिकूल ग्रह वाढीस लागण्यास हातभारच लावला आहे. परंतु, मराठीदेशी विद्यापीठीय तत्त्वज्ञानावर आंग्ल विश्लेषक तत्त्वज्ञानाचाच अंमल असूनही, सुदैवी मराठी साहित्यसमीक्षेला कॉलिंगवुडच्या कलामीमांसेची सुगम व सुंदर ओळख रा.भा. पाटणकर यांनी पूर्वीच करून दिलेली आहे. आणि त्याहीपूर्वीपासून मराठी समीक्षकांवर कॉलिंगवुडचा प्रत्यक्ष-अप्रत्यक्ष प्रभाव पडत आलेला आहे. उदाहरणार्थ, गंगाधर गाडगीळ म्हणतात, ''विशेषतः रिचर्डस, कॉलिंगवुड, सुसान लँगर, कोलरिज एलियट व मर्ढेकर यांच्या लेखनाचा माझ्या साहित्यविषयक भूमिकेवर पुष्कळच परिणाम झाला आहे आणि या पुस्तकातील ('खडक आणि पाणी') अनेक विचारांचे मूळ वाचकाला त्यांच्या लेखनात सापडेल.'' (गाडगीळ, पृ. ४).

पाटणकरांची 'सौंदर्यमीमांसा' विश्लेषक तत्त्वज्ञानाच्या फेऱ्यांतून अजिबात सुटू शकली नाही; पण कान्ट, क्रोचे आणि कॉलिंगवुड यांच्यावरील भाष्यत्रयी ही पाटणकरांनी मराठीला दिलेली मौलिक कॉन्टिनेण्टल मेजवानी आहे. आपल्या 'कॉलिंगवुडची कलामीमांसा : एक भाष्य' ह्या पुस्तकाच्या प्रस्तावनेत (पृ.१) पाटणकर म्हणतात, ''हे पुस्तक इंग्रजीत आहे; ते मुळातच वाचणे कोणाही सुशिक्षित मराठी वाचकास शक्य आहे. ज्यांना इंग्रजी वाचायची अजिबात सवय नाही त्यांचीही सोय 'प्रिन्सिपल्स'च्या... मालशे यांनी केलेल्या मराठी भाषांतराने लवकरच होणार आहे, हा चांगला योगायोग आहे.'' परंतु, विवेचक इंग्रजी वाचण्याची अजिबात सवय नसलेला सुशिक्षित मराठी वाचक पराकोटीचा दुर्दैवी आहे. त्याला कॉलिंगवुड अजिबात





अनुक्रमणिका

न कळण्याची पुरेपूर सोय मालशेकृत भाषांतरानं करून ठेवली आहे.

बोजड विचार व्यक्त करू पाहणारी भाषा बेंगरूळ होऊ शकते; पण अगोदरच उच्चारलेलं संदर्भांकित स्पष्ट विधान अनुसरणारी भाषा इतकी तांत्रिक, इतकी अंस्वाभाविक कशी असू शकते ?

''कोणतीही नियंत्रित आणि अभिव्यंजक स्वरूपाची शारीरिक क्रिया, मग ती शरीराच्या कोणत्याही भागाशी निगडित असो, सुचवण्यासाठी 'भाषा' हा शब्द आपण उपयोजित आहोत. अशी ही केवळ एकमेव क्रिया आहे असे मानण्याकडे कल दिसून येतो; किंवा निदानपक्षी अभिव्यंजकतेच्या बाबतीतली म्हणजे बोलण्याच्या किंवा वागिंद्रियांच्या हालचालींच्या बाबतीतली, त्यातही बाकीच्या हालचालींना खूपच मागे टाकणारी अशी ती गोष्ट आहे, असे मानण्याची प्रवृत्ती विशेष दिसून येते. ह्या मानवी तथ्याला शरीरनिष्ठ कारण असते, असेही कधी कधी सुचविले जात असते. हे मानीव तथ्य म्हणजे वागिंद्रियांचा उपयोग करून अधिकतर सूक्ष्म भेदाभेद सुचविणाऱ्या विविध प्रकारच्या हालचाली साधल्या जात असतात, आणि म्हणून अन्य शारीरिक अवयवांच्या कोणत्याही संयोगाच्या उपयोजनाहून भाषेत वागिंद्रियांच्या हालचालींचा विकास होण्याच्या दृष्टीने त्या अधिक सोयीच्या ठरत असतात.'' (मालशे, पृ. २७९)

''आधुनिक काळात 'सौंदर्य' या शब्दाची मक्तेदारी स्वत:कडे घेण्याचा प्रयत्न सौंदर्यमीमांसकांनी अगदी नेटाने चालविलेला आहे; एखाद्या गोष्टीचे चिंतन करीत असताना तिच्या ठायी असणाऱ्या गुणाचा आपण सौंदर्यात्मक अनुभव म्हणून आस्वाद घेतो व या गुणाला सौंदर्य हे अभिधान लावण्याचा प्रयत्न या सौंदर्यमीमांसकांनी केलेला आहे. परंतु असा कोणताही गुण अस्तित्वातच नसतो...'सुंदर' (ब्यूटि) आणि 'सौंदर्य' (ब्यूटिफुल) या शब्दांच्या वापरामध्ये सौंदर्यात्मकतेचा (इस्थेटिक) कोणताही अर्थ अभिप्रेत नसतो.'' (मालशे, पृ. ४४-४५)

इथे तर भाषेची अस्वाभाविकता अर्थ-अराजकाकडे झुकू लागण्याचा धोका उद्भवतो. सौंदर्यमीमांसकाचं नावच सांगतं की त्याचा प्रधान उद्योग सौंदर्याची मीमांसा करणं हा आहे. मग भाषांतरकारांचं शेवटचं वाक्य असं व्याघाती व अर्थशून्य का भासतं ? 'सुंदर'मध्ये 'सौंदर्यात्मकता' का नसते ? कंसातले इंग्रजी शब्द सहजच सांगतात की कॉलिंगवुडना अभिप्रेत असलेला 'ब्युटिफुल' आणि 'एस्थेटिक' यांच्यातील फरक इथे डोकावतोय; पण मराठीत 'एस्थेटिक'साठी रुळलेल्या 'सौंदर्यात्मक' ह्या शब्दाऐवजी दुसऱ्या शब्दाची योजना करण्याचा निर्णय भाषांतरकारांनी घेतलेला नाही वा तसा निर्णय घेणं टाळलेलं आहे. तरीही काहीएक कष्ट घेऊन हा भाग आपल्याला समजू शकतो. पण 'अभिव्यक्ती' ही आपली कळीची संकल्पना कॉलिंगवुड ज्या

भागात पहिल्यांदा मांडतात त्या भागाची भाषांतरात भयंकर ससेहोलपट झालेली आहे.

''कलावंत भावनांची अभिव्यक्ती करीत असतो, असे *म्हणणाऱ्याहून* सर्वस्वी सुपरिचित असे दुसरे काही असणार नाही. प्रत्येक कलावंताला आणि *कलेची थोडीफार जाण* असणाऱ्या अन्य कोणाही माणसाला या विचाराची चांगली ओळख असते, हा *विचार पुढे मांडणे* म्हणजे काही एखादा तात्त्विक *सिद्धांत पुढे मांडणे* किंवा कलेची व्याख्या करणे नव्हे.... ते ज्या घटनेच्या संदर्भात बोलत असतात, मग ती घटना खरी असो वा मानीव असो, ती *निश्चित प्रकारची* असते. 'माणूस भावनेची अभिव्यक्ती करतो' असे म्हणत असताना त्या माणसाविषयी जे सांगितले जात असते, त्याचा मथितार्थ असा असतो : प्रथमत: आपल्या ठायी भावना असल्याचे भान त्याला असते, परंतु सदर भावनेचे नेमकं स्वरूप काय असते, याचे भान नसते. *अंतर्मनात* जी जाणवत असते. पण तिच्या स्वरूपाची ओळख पटलेली नसते, अशा खळबळीची किंवा प्रक्षोभाची मात्र त्याला जाणीव झालेली असते... या असहाय आणि दडपणाच्या अवस्थेतून स्वत:ची सुटका करून घेण्यासाठी तो जे काही करतो, त्यालाच तो अभिव्यक्ती करीत आहे, असे आपण म्हणतो. जिला आपण भाषा म्हणतो, त्या गोष्टीचा या प्रत्यक्ष क्रियेशी काहीतरी संबंध असतो. तो *बोलण्यामार्फत अभिव्यक्ती करत असतो* आणि या क्रियेचा जाणिवेशीही काही संबंध असतो. त्याला अभिव्यक्ती झालेली भावना जाणवलेली असते. त्यानंतर काही त्याला तिचे स्वरूप अबोध राहिलेले नसते. ज्या पद्धतीने ती भावना आपणास जाणवत असते, त्या पद्धतीशीही या गोष्टीचा काहीएक संबंध नसतो.'' (मालशे, पृ. १२८-१२९, तिरपा ठसा माझा.)

कॉलिंगवुडचर्चेत जसाच्या तसा उद्धृत करून वारंवार चर्चिला जाणारा हा भाग भाषांतरात विशुद्ध चुकांचं कडबोळं होऊन जातो :

(१) कॉलिंगवुडच्या मूळ परिच्छेदात 'म्हणणे' सुपरिचित आहे, 'म्हणणारा' नाही. हा मुद्राराक्षसाचा प्रताप मानावा का ?

(२) 'अक्वेन्टन्स विथ द आर्ट्स' म्हणजे कलांची थोडीफार 'ओळख' की 'जाण' ?

(३) मराठीत विचार वा सिद्धांत पुढे मांडत नाहीत; मराठीत विचार वा सिद्धांत मांडतात. कॉलिंगवुडच्या 'टु स्टेट' ह्या सालस क्रियापदासाठी भाषांतरकारांनी हा अजब पर्याय योजिलेला आहे.

(४) 'ऑफ अ डेफिनेट काइंड' म्हणजे 'एका विशिष्ट प्रकारची' नव्हे तर 'निश्चित प्रकारची' !

(५) 'विच ही फील्स गोइंग ऑन विदिन हिम' म्हणजे 'अंतर्मनात जी जाणवत असते', हे म्हटले तर अत्यंत अचूक भाषांतर आहे. परंतु, 'अंतर्मन' ही

कॉलिंगवुडच्या गावीही नसलेली मराठी संकल्पना आगंतुकपणं ह्या वर्णनात शिरते. ती तशी मुळीच शिरायला नको. भाषांतर म्हणजे स्वत:ची संकल्पना-पोतडी खुली करणे नव्हे. [अनुभवाच्या 'सायकिकल लेव्हल'करिता (कॉलिंगवुड, पृ. १६४) 'मानसिक पातळी' हा पर्याय वापरून (मालशे, पृ. १९) भाषांतरकारांनी मूळ संकल्पनेचं गुणवैशिष्ट्य बाद करण्याचीच खटपट केल्यासारखं वाटत राहातं. सायकिकल फीलिंग जाणिवेला, कॉन्शसनेसला ज्ञात झाल्यावर ती मानसिक असते की नसते ? एका अर्थी असतेच. मग केवळ सायकिकल फीलिंगलाच मराठीत मानसिक का मानायचं ?]

(६) ह्या वर्णनात कॉलिंगवुड अभिव्यक्ती, भाषा आणि जाणीव ह्या तीन प्रमुख संकल्पनांचा परस्परसंबंध दाखवितात. भाषांतरात भाषा आणि जाणीव तांत्रिक संज्ञा न वाटता नेहमीच्या अर्थाचे शब्द वाटतात. कॉलिंगवुडच्या मूळ परिच्छेदातील ह्या दोन्ही संज्ञांच्या प्रवेशसमयीच्या वाक्यांत विसर्ग आहे. ती विसर्गचिन्हं भाषांतरात अंतर्धान पावतात आणि स्वत:सोबत संज्ञांचं संज्ञापण धुळीस मिळवतात. परीक्षणाच्या सुरुवातीला उल्लेखिलेला विचार ह्याच वर्णनाचा एक अन्वयार्थ आहे. असे अन्वयार्थ वरील भाषांतरित वर्णनातून स्फुरू शकत नाहीत. कॉलिंगवुडच्या वर्णनातील बहुविध सुप्त अर्थपदर असे लुप्त होता कामा नयेत.

(७) 'ही एक्सप्रेसेस हिमसेल्फ बाय स्पीकिंग (तो बोलून आपली भावना व्यक्त करतो.)' असं कॉलिंगवूड म्हणतात; 'बोलण्यामार्फत' केलेली अभिव्यक्ती ह्या कर्कश प्रकारात कॉलिंगवुडना स्वारस्य नाही.

सुपरिचित आनुभविक सत्यांवर आधारलेल्या कॉलिंगवुड यांच्या कलातत्त्वविचाराला अनेक प्रत्यक्ष कलाकृतींच्या (उदा० सेझानची चित्रं) व साहित्यकृतींच्या (उदा. टी.एस. एलियटच्या कविता) मर्मज्ञ रसग्रहणाची जोड लाभलेली आहे. पण कॉलिंगवुडचा 'सेझान' भाषांतरात एके ठिकाणी 'सिझानी' (पृ. १६७) असतो, एके ठिकाणी 'सेझानी' (पृ. १६८) असतो, तर 'भाषांतरकारांच्या पुरवणी टिपां'मध्ये 'सेझन' (पृ. १८०) होऊन येतो. इथे मुद्राराक्षस विक्रमवीर झालाय की काय ? अमराठी विशेषनामं मराठीत कशी लिहावीत हा प्राधान्याने निवडीचा प्रश्न आहे; पण ती एकाच शब्दाची नि:संदिग्ध निवड असली पाहिजे. कॉलिंगवुड एका आणि एकाच वास्तविक चित्रकाराबद्दल लिहिताहेत हे वाचकाच्या तात्काळ लक्षात यायला पाहिजे. 'सेझन'बद्दलच्या टिपेत आपल्याला कळतं की तो 'फ्रेंच चित्रकार' होता आणि 'पिकासोचा पूर्वसूरी मानला जातो' (मालशे, पृ. १८०). आता, पिकासोला अन्य

पूर्वसूरी नव्हते का ? 'पिकासोचा पूर्वसूरी' ही सेझानची अनन्यसाधारण, निदान पुरेशी वेगळी, ओळख आहे का ? कॉलिंगवुडच्या लाडक्या सेझानवर इतका अन्याय का ? अखेरीस दिलेल्या परिभाषासूचीत 'ट्यून'साठी 'स्वरावली, चाल' हे प्रतिशब्द दिलेले आहेत (मालशे, पृ. ३९१); प्रत्यक्ष भाषांतरात मात्र 'स्वररचना' हा प्रतिशब्द वापरलेला दिसून येतो (मालशे, पृ. १६२). यात काय संगती आहे ?

प्रस्तावनेत मिलिंद मालशे म्हणतात, "डॉ. रा.भा. पाटणकरांनी लिहिलेल्या कॉलिंगवुडच्या सिद्धान्तावरील भाष्याची मदत तर खूपच झाली." परंतु पाटणकरांच्या भाष्याने देऊ केलेली मदत ह्या भाषांतरात मुळीच प्रतिबिंबित झालेली नाही. कॉलिंगवुडच्या संकल्पना व संज्ञा-सामुग्रीवर भाषांतरकारांची फारशी पकडच आलेली नाही. मूळ इंग्रजी वाक्यांना जसेच्या तसे - त्याच क्रमाने, त्याच मोडणीचे - मराठी पर्याय निर्मिण्याच्या सुट्या-सुट्या नादांत हे भाषांतर बेताल होऊन गेले आहे. सुशिक्षित मराठी वाचकाला सैद्धांतिक वाचनाची गोडी लावण्यासाठी अशा भाषांतरांचा फारसा उपयोग होणार नाही. मराठीच्या वाटेने कॉलिंगवुडच्या गावाला जाण्यासाठी पाटणकरांनी फडकवलेलं निशाण लक्षात घ्यावं; ह्या भाषांतराच्या फंदात मात्र पडू नये.

**संदर्भ :**

कॉलिंगवुड, आर.जी.१९३८. दी प्रिन्सिपल्स ऑफ आर्ट. ऑक्सफर्ड युनिव्हर्सिटी प्रेस, लंडन.

गाडगीळ, गंगाधर. २००३. खडक आणि पाणी (४थी आवृत्ती). उत्कर्ष प्रकाशन, पुणे.

पाटणकर, रा.भा. १९९५. कॉलिंगवुडची कलामीमांसा - एक भाष्य. प्राज्ञपाठशाळा मंडळ, वाई. ■

द्वारा - श्री. शरद सोमण, 1411, शुक्रवार पेठ, रतन सायकल मार्टजवळ, पुणे 411002.

---

**लेखकांना आवाहन**

पुढील विषयांसंबंधीचे लेखन 'भाषा आणि जीवन'ला हवे आहे :

मराठी, अन्य देशीविदेशी भाषा, भाषांची तुलना (शब्दघटना, रचनावैशिष्ट्ये, इ० भाषाविज्ञान, भाषांतर, शैली (व्यवहारातील व साहित्यातील), भाषिक व भाषाशिक्षणविषयक संशोधन, परिभाषा, भाषिक वर्तन, भाषाविषयक शैक्षणिक, शासकीय धोरणे, पुस्तक-परीक्षणे, पानपूरके, पत्रिकेतील प्रकाशित मजकुराबद्दल प्रतिक्रिया, आपली भाषिक प्रचीती, मराठीच्या प्रादेशिक, व्यवसायविशिष्ट, वयोगटविशिष्ट, लिंगविशिष्ट बोलींची वैशिष्ट्ये, मराठी भाषेवरील इतर भाषांचा परिणाम, कवितांचे शैलीवैज्ञानिक विश्लेषण, कवितेची भाषा, साहित्याची भाषा, परिभाषाकोशांचा परिचय/परीक्षणे.

---

पुस्तक-परीक्षण

# अनुवादही नाही, रूपान्तरही नाही !

मृणालिनी गडकरी

[परीक्षित पुस्तके : 'रवीन्द्र गीतालि' व 'रवीन्द्र गीतिमाल्य'. डॉ. राम म्हैसाळकर, प्रकाशक : भवान म्हैसाळकर २८, हिंदुस्थान कॉलनी, वर्धा रोड, नागपूर. किंमत अनुक्रमे रु १२५/- व रु. १५०/-, पृष्ठे अनुक्रमे - १५६ व १८९, ९मे २००५]

वैद्यकीय व्यावसायिक असलेल्या डॉ. राम म्हैसाळकरांना रवीन्द्रनाथ टागोरांच्या काव्यात विशेष रस असल्याचे दिसते. 'रवीन्द्र गीतांजली', 'रवीन्द्र भावांजली' आणि 'रवीन्द्र काव्यांजली' ह्या रवीन्द्रकाव्याच्या तीन अनुवादांनंतर त्यांनी आता 'रवीन्द्र गीतालि' आणि 'रवीन्द्र गीतिमाल्य' हे दोन अनुवाद प्रसिद्ध केले आहेत.

'रवीन्द्र गीतालि' ह्या संग्रहात 'गीतालि' आणि 'स्मरण' ह्या रवीन्द्रनाथांच्या दोन काव्यसंग्रहांतील कवितांचा मराठी अनुवाद आहे; तर 'रवीन्द्र गीतिमाल्य' ह्या संग्रहात 'गीतिमाल्य' आणि 'संयोजन' ह्या काव्यसंग्रहांतील कवितांचे अनुवाद आहेत.

रवीन्द्रनाथांच्या काव्याचा अनुवाद करणे हे एक आव्हानच ठरते. कारण रवीन्द्रनाथ नुसतेच रोमँटिक कवी नाहीत. त्यांच्या काव्याला विशिष्ट तत्त्वज्ञानाची बैठक आहे. त्यांना अखिल विश्वातील प्रत्येक सजीवात ईश्वराचा अंश असल्याचा साक्षात्कार होतो. एका विशिष्ट बिंदूपासून - मग ह्या बिंदूला तुम्ही प्रभू म्हणा, परमेश्वर म्हणा, जगन्नियंता म्हणा किंवा आणखी वेगळ्या नावानं संबोधा - निघालेले चैतन्य त्यांना अखिल विश्वात सळसळताना दिसते. ह्या चैतन्याला त्यांनी 'जीवनदेव' म्हटले आहे. हा 'जीवनदेव' त्यांना जीवनात सतत भेटत असल्यामुळेच मूर्तीरूपातील देवाची पूजा करणे त्यांना पटतही नाही आणि त्याची आवश्यकताही वाटत नाही. रवीन्द्रनाथांच्या अध्यात्मविचारात जन्मजात असलेली निसर्गाची ओढ, ब्राह्म-समाजाचा एकेश्वरवाद, बंगालचे देवीपूजन, बाऊलांची भटकी पण आनंदी वृत्ती, वैष्णवांची मधुर-भाव-भक्ती, सूफींची गूढता आणि परमेश्वरविषयक प्रीती, वेद-उपनिषदांतील तत्त्वशोध ह्यांचा सुरेख संगम झालेला दिसतो. हे सर्व समजावून घेतल्याशिवाय अनुवादकाला रवीन्द्र-काव्याचे अनुवादकार्य पेलणे अशक्य आहे. डॉ. राम म्हैसाळकरांना हे आव्हान पेललेले नाही. उदाहणादाखल 'गीतिमाल्य' ह्या संग्रहातील 'उपहार' नावाची कविता पहा. प्रथम

मूळ बंगाली कविता, देवनागरी लिपीत :

राजपुरिते बाजाय बांशी बेलाशेषेर तान ।
पथे चलि, शुधाय पथिक, 'कि निलि तोर दान'
देखाब जे सबार काछे एमन आमार कि बा आछे !
संगे आमार आछे शुधु एइ करवानि गान ॥
घरे आमाय राखते जे हय बहु लोकेर मन –
अनेक बांशी, अनेक कांसि, अनेक आयोजन ।
बंधुर काछे आसार बेलाय गानटि शुधु निलेम गलाय,
तारि गलार माल्य करे करब मूल्यबान् ॥

[बेलाशेषेर = सरत्या दिवसाची. शुधाय = विचारतो. अनेक बांशी... आयोजन = बरेच गायनवादन, बरेच संगीत म्हणजेच बरीच जमवाजमव, बरीच धावपळ. (शब्दश: अर्थ बांशी = बासरी, अनेक = खूप, पुष्कळ. कांसि = झांजा) बंधु = मित्र (येथे प्रभू, परमेश्वर. रवीन्द्र – काव्यात तो विविध रूपात येतो.)]

कवितेचा अर्थ असा : राजपुरीत बासरी वाजतेय. सरत्या दिवसाची तान गुंजतेय. मला वाटेत एका वाटसरूनं विचारलं, 'तिथं देण्यासाठी काय घेतलंयस ?' सगळ्यांना दाखवावं असं माझ्यापाशी आहेच काय ? ही काही गाणी आहेत माझ्याजवळ. तीच गळ्यात बांधून घेतलीत. घरात मला पुष्कळांचं मन राखावं लागतं. त्यासाठी किती गाणी ! किती जमवाजमव ! मग मित्राकडे जाताना ही गाणी तेवढी घेतली. त्यांचाच हार करेन. तोच बहुमोल ठरेल.

आता म्हैसाळकरांचा अनुवाद पाहा (रवीन्द्र गीतिमाल्य पृ.७४, कविता क्र.६१)

राजवाड्यातल्या सनईवर सायंकालीन मारवा वाजतो.
मी रस्त्यानं जायला निघालोय्
पथिक विचारतो –
'कोणतं दान मिळालं तुला ?'
काय सांगू ?
सांगत सुटावं असं खरंच काय मिळालं ?
माझ्याजवळ आहे फक्त एक अभंग !
पुष्कळांचं मन राखावं लागतं मला
त्यांना नाराज करता येत नाही.
कुणाची बासरी... कुणाचा तबला
कुणाची सम्मेलनं - तर कुणाचं...

सगळंच सांभाळावं लागतं !
वधूकडे जाताना हा अभंग घेतला
त्याचा हार तिच्या गळ्यात टाकला
अन् तोच अनमोल झाला !

येथे म्हैसाळकरांनी लावलेला अर्थ नुसताच चुकीचा नाही तर रवीन्द्रनाथांच्या कवितेवर अन्याय करणारा आहे. वास्तविक कवी आपल्या मित्राकडे म्हणजेच ईश्वराकडे चालला आहे. त्याच्याकडून दान घेऊन परत येत नाही आहे. प्रथेप्रमाणे तो काही भेट घेऊन जात आहे. त्यामुळे वाटसरूचा 'काय दान मिळालं रे तुला ?' हा प्रश्नच चुकीचा आहे. आणि 'सांगत सुटावं असं खरंच काय मिळालं ?' असं रवीन्द्रनाथ कधीच म्हणणार नाहीत. असे म्हणणे म्हणजे ईश्वराचा अपमानच !

म्हैसाळकरांना बंगाली येत नसावे. इतरांच्या मदतीने किंवा दुसऱ्या एखाद्या भाषेतील दुय्यम प्रतीच्या अनुवादाचा आधार घेऊन ते अनुवाद करत असावेत. नाहीतर 'बंधू'चा अर्थ 'वधू' असा त्यांनी घेतलाच नसता आणि 'संयोजन' हा रवीन्द्रनाथांचा काव्यसंग्रह आहे असे धडधडीत बेजबाबदार विधान त्यांनी केले नसते. बहुधा रवीन्द्रनाथांच्या काही कवितांचा आणि गीतांचा कुणीतरी दुसऱ्या एखाद्या भाषेत केलेला तो अनुवाद असावा. अनुवादात अर्थाची गळती होतेच. पण म्हैसाळकरांच्या अनुवादात सर्वच गळून जाते. म्हैसाळकरांना कवितेचा आशय, कवीची शैली समजून घ्यायला हवी असेही वाटत नसावे. त्यामुळे मराठीतील अभिव्यक्तीही हास्यास्पद ठरते. ते रवीन्द्रनाथांना वधूकडे जाताना अभंगाचा हार घेऊन जायला लावतात ! 'गाणं' ऐवजी 'अभंग' का ? 'अभंग' म्हटले की भक्ती आठवते. पण 'गाणं' अध्यात्म, आनंद, प्रेम अशा बऱ्याच भावनांची आठवण करून देते.

'एकला चलो रे' ह्या रवीन्द्रनाथांच्या सर्वपरिचित आणि प्रसिद्ध गीताचा अनुवादही असाच पूर्णपणे फसलेला आहे. खरे तर हे गीत स्वातंत्र्यासाठी लढणाऱ्याची मानसिकता कशी असावी, भयंकर अडचणींवर त्यानं कशी मात करावी ह्याचं दिग्दर्शन करते आणि त्याचे मनोबलही वाढवायला मदत करते. रवीन्द्रनाथांनी १९०५ साली हे लिहिले. तेव्हा वंगभंगविरोधी आंदोलन पूर्ण भरात होते. मूळ बंगाली गीताची चालसुद्धा लष्कराच्या संचलनगीताच्या जवळ जाणारी आहे. पण म्हैसाळकर ह्या गोष्टी लक्षात न घेताच 'तुझा प्रवास चालू ठेव एकाकी : एकट्यानं नि:शंक : नि:संग ! तुझी खिल्ली उडवली पण म्हणून अबोल राहू नकोस - सांगत रहा : शिकवत रहा खुल्या दिलानं : मोकळ्या मनानं ! शीळ फुंकत प्रस्थान कर सतत : अव्याहत ! (संयोजन (रवीन्द्र गीतिमाल्य : कविता क्र. ३३ पृ. १६७) असा स्वत:च्याच मनाचा

उपदेश त्यात घुसडून सगळ्याचाच विचका करून टाकतात.

दोन्ही संग्रहांतील जवळजवळ सर्वच कवितांची स्थिती ही अशीच आहे. नाही म्हणायला 'रवीन्द्र गीतालि'तील 'स्मरण'मधील क्र. २, ४, ७, १० व ११ [पृष्ठ क्र. (अनुक्रमे) ११६, ११९, १२४, १२७ व १२८] अशा काही कविता अनुवादात बऱ्या उतरल्या आहेत. कारण त्या सरळ आत्मपर आहेत. 'शिवाजी उत्सव' ह्या कवितेच्या पूर्वी दिलेली माहितीही रवीन्द्रनाथांच्या एखाद्या उत्तम चरित्रातून न निवडता सुनील गंगोपाध्यायांच्या 'प्रथम आलो' ह्या कादंबरीच्या आधारे घेतली आहे. त्यामुळे तीही अर्धवट व चुकीची आहे. त्यात गणेश सखाराम देऊसकरांचा उल्लेख कसा नाही ? त्यांच्याच विनंतीवरून 'शिवाजी उत्सव' ह्या त्यांच्या पुस्तिकेसाठी रवीन्द्रनाथांनी ही कविता लिहिली होती.

अनुवादात शब्दाची निवडही फार महत्त्वाची असते. कारण त्याशिवाय कवीने आपल्या काव्यात व्यक्त केलेला भाव दुसऱ्या भाषेतील वाचकांपर्यंत पोहोचणार तरी कसा ! पण म्हैसाळकर नावेला 'बोट', अंधाराला 'तमिस्र', गाण्याला 'अभंग', नदीला 'सरिता' असे शब्द वापरतात. हे असे शब्द काव्याच्या प्रवाहीपणाला मारक ठरतात. 'तुझ्या तमिस्रात मी सावडू बघतोय्' (गीतिमाल्य पृ. १२०), 'सगळं डोक्यावरून जातं', (गीतिमाल्य पृ. ८६), 'माझं हृदय तुडुंब भरलंय् – वातोल्लासित होऊन वाहतंय्' ह्या शैली-संकर करणाऱ्या ओळी रसिक वाचकाला खटकल्याशिवाय राहणार नाहीत. ही शब्दयोजना काव्यातील काव्यात्मकताच मारून टाकते. असे शब्द योजताना म्हैसाळकर 'आपण रवीन्द्र – काव्याचा अनुवाद करतोय' हे विसरून जातात.

आणखी एक गोष्ट येथे नमूद करावीशी वाटते. ती म्हणजे रवीन्द्रनाथांच्या बहुतांश कवितांखाली ती लिहिल्याची तारीख किंवा महिना आणि साल ह्याचा उल्लेख असतो. त्याचबरोबर स्थळाचाही उल्लेख ते करतात. कविता पूर्णपणे कळण्यास ह्या गोष्टींची फार मोठी मदत होते. पण म्हैसाळकरांनी ह्याची दखलच घेतलेली नाही. कदाचित् ह्या गोष्टीचे त्यांना महत्त्वच वाटत नसावे.

डॉ. म्हैसाळकरांचे हे अनुवाद वाचल्यावर रवीन्द्र-काव्याचा आनंद मिळण्याऐवजी रवीन्द्रनाथ हे अतिशय सामान्य दर्जाचे कवी होते असा वाचकांचा समज होईल. एकंदरीत पाहता रवीन्द्रनाथांच्या कवितांच्या पहिल्याच अनुवादित संग्रहाला महाराष्ट्र साहित्य परिषदेचा प्रतिष्ठित मानला गेलेला अनुवाद-पुरस्कार म्हैसाळकरांना मिळाला असल्याने मोठ्या आशेने हे दोन संग्रह मी हातात घेतले; पण माझ्या पदरी घोर निराशाच पडली असे अतिशय कष्टाने म्हणावे लागते. ■

8-अ, कांचनबन, सेनापती बापट मार्ग, पुणे 411016. दूरध्वनी 25658306

पुस्तक-परीक्षण

# परीघाचा विस्तार करणारा काव्यानुवाद

जया परांजपे

[परीक्षित पुस्तक : 'आपण जे पाहतो' – बलवंत जेऊरकर. साहित्य अकादेमी, नवी दिल्ली. पृष्ठे ६६, किंमत रु. ६०/- २००५]

प्रा. बलवंत जेऊरकर यांनी हिंदीतील प्रथितयश कवी श्री. मंगलेश डबराल यांच्या 'हम जो देखते हैं' या साहित्य अकादमी पुरस्कृत काव्यसंग्रहाचा 'आपण जे पाहतो' या नावाने मराठी अनुवाद करून एक स्तुत्य व मोलाचे काम केलेले आहे.

१९६०नंतरच्या भारतीय राजकीय, सामाजिक व सांस्कृतिक पर्यावरणातील वेगाने होत असलेल्या बदलांच्या लाटेत चिंतनशील व संवेदनाक्षम मनाची घुसमट व अस्वस्थता ही या संग्रहातील कवितांची पृष्ठभूमी आहे. नातेसंबंधातील बदल व कुटुंब-व्यवस्थेबाबतच्या पर्यायी विचारांना सामोरे जाण्याची गरज व त्याचवेळी खोलवर रुजलेली आपल्या पारंपरिक कुटुंबव्यवस्थेबाबतची आस्था, धर्म-संप्रदाय-भाषा यांच्या नावावर होणारी अमानुष हिंसा, दहशतवादाचे सावट, सर्वत्र बोकाळलेला भ्रष्टाचार, उपभोगाची लाट, पैसा व स्वार्थाचा वरचष्मा, पाश्चात्य ज्ञानाचा व संस्कृतीचा जवळून परिचय व प्रभाव, तंत्रज्ञानातील शोधांनी घडवून आणलेले बदल व त्यामुळे बदललेली जीवनरहाटी, महानगरातील व खेड्यातील जीवन-वास्तव, गोठलेल्या संवेदना अशा आजच्या जीवनातील गुंतागुंतीच्या जाणिवांचा वेध डबरालांच्या कविता अत्यंत वेधकपणे घेतात, आजच्या जगण्याचा-जीवनाचा अर्थ शोधण्याचा प्रयत्न करतात. वास्तवाचा वेध घेत असताना कुठेही अतिभावुक न होता कवी अत्यंत वेचक शब्दांतून हे सगळं व्यक्त करतो. 'निर्भयपणे क्रूरता करणाऱ्यांच्या बाबत माझी घृणा शिल्लक आहे हेही काही कमी नाही', 'सकाळ होताच गजबज, काळजी, घाम व स्वार्थ यांचं एक जग इथं अवतरतं', 'इतक्या प्रचंड जनसमूहात कुणालाही निरालांच्या ओळीचं स्मरण होत नाही', 'किमान एक माणूस तरी वाचला पाहिजे, फोटोत नव्हे तर नग्न जिवंत' अशी किती तरी उदाहरणे देता येतील. जीवनाविषयी गंभीर चिंतन, परिस्थितीचे नेमके 'भावभान' आणि ते पकडणारी 'अचूक भाषा' ही या कवितांची वैशिष्ट्ये आहेत.

भावनांना स्पर्श करूनही या कविता भावुक बनत नाहीत व विचार करायला लावूनही शुष्क बनत नाहीत. (जीवनाचे वास्तव, त्याबाबतचे विचार व भाव-संवेदन कवितामध्ये उतरत असताना कविता भावकवितेचा किंवा चिंतनगर्भ विचारकवितेचा एकांगी घाट स्वीकारत नाहीत तर यांचा सुरेख मेळ कविता वाचताना प्रत्ययाला येतो.) कवितांमध्ये प्रकटणाऱ्या काव्यमय गद्यलयीचे गमक हेच असावे असे वाटते.

डबरालांच्या कवितेची ही वैशिष्ट्ये तितक्याच ताकदीने मराठीत उतरविण्याचे कसब जेऊरकरांच्या अनुवादात आहे. त्यांचा हिंदी भाषा व साहित्याचा सखोल अभ्यास आहे. ते स्वत:ही कवी आहेत आणि साहित्याची उत्तम जाण असणारे बहुपठित सुजाण वाचक आहेत. त्यांना काव्यानुवादाचा पुरेसा पूर्वानुभवही आहे.

साहित्याच्या व खासकरून काव्याच्या अनुवादामध्ये शब्दांची निवड शब्दकोशातील सामान्य अर्थांच्या पलीकडे जाऊन करण्याची जाण अनुवादकाला असणे कसे गरजेचे असते हे या अनुवादातील बऱ्याच उदाहरणांमध्ये पाहता येईल.

सीमित कर देना - दामटून बसवणं / खाक छान चुके - वणवण भटकलो

आग - शेकोटी / हरकतें - चाळे / पृष्ठभूमि - पडद्यामागे

सन्नटा जाता है - शांतता सरपटत जाते / कामना - अपेक्षा

निरंतर गिरती बारिश - संततधार कोसळणारा पाऊस

या सर्व उदाहरणांमध्ये मराठीतील प्रतिशब्द देणे एवढेच काम न करता अनुवादकाने संदर्भानुसार केलेले चपखल शब्दप्रयोग कवितेतील त्या-त्या ठिकाणचे भाव तितक्याच ताकदीने मराठीत उतरविण्याचे काम करून न थांबता कवितेच्या एकूण रसास्वादनातही उपकारक ठरतात.

काव्यानुवादात दुसऱ्या भाषिक अवकाशात मूळ काव्यातील भाव व लय यांचा मेळ घालण्याच्या कसरतीत कधी-कधी भाषेच्या म्हणून काही मर्यादा येतात. जसे हिंदीतील करो, कीजिए आणि कीजिएगा या क्रियापदांच्या रूपांसाठी मराठीत तीन वेगळी, स्वतंत्र रूपे नाहीत तेव्हा 'कीजिएगा'मधील 'सादर सविनय' भाव व्यक्त करण्यासाठी 'कराल ना', 'करा हं', 'कृपया करा', 'करावे', 'एवढं कराल का'... वगैरे रूपे तयार करावी लागतील. मराठीतील 'चुकामूक', 'हौस', 'कंटाळा' अशा काही शब्दांना हिंदीत समर्पक शब्द नाहीत. अशावेळी अनुवादकाला काही जोड-घट किंवा बदल करावेच लागतात. शिवाय भावसाम्यासाठीही काही बदल करावे लागतात. हे बदल अर्थातच शब्द, वाक्यरचना वा संपूर्ण संदर्भ या स्तरावरही असू शकतात. खालील संदर्भ या दृष्टीने पाहता येतील :

कहीं = कुठंही, कुठंतरी, कुठंच / देखने को होते हैं = पाहणार एवढ्यात





अनुक्रमणिका

दूर = दूरवर / तब दिखा = तेव्हा कुठं पाहिलं
किसी और = कुठल्याशा / नहीं = नाही ना
न गीत में; न उन आँखों में = गाण्यातही डोळ्यांतही
जब कि = नेमका तेव्हाच / गर्म कर रहा है = तापवतंय
क्या तुम छटोगे = जर हटशील
मिलती थी = मिळता-जुळता होता, हँसते हुए = हसत-हसत

या उदाहरणांमध्ये अधोरेखित शब्दांत मराठीचे खास वैशिष्ट्य असणाऱ्या अनुबोधकांचा वापर, एकारांत ऐवजी अनुस्वारांत शब्दांचा प्रयोग व जास्तीच्या शब्दांचा वापर या सर्वांमुळे मराठी भाषेचा स्वाभाविक बाज जपण्याबरोबरच संदर्भानुकूल भाव अधिक उत्कटतेने व्यक्त होण्यास मदत झालेली आहे.

अशाच प्रकारचे आणखी काही भाषिक बदल पाहण्याजोगे आहेत.
'काम चल जाता है', = काही बिघडत नाही / 'रोजी-रोटी' = मीठ-भाकर
'साथ-साथ' = सोबतीने / 'बंद है' = कोंडलेली
'खडे रहते है' = रेंगाळतो / 'रास्ता नहीं बचा' = वाट सापडत नाही
'चाँद'साठी बालकांच्या भावविश्वातील चांदोबा. 'छोटा'साठी लहानगा
'काम चलाते हैं' = भागवतात / 'बचाए रखते हैं' = जपतो
'यह काफी है' = हेही काही कमी नाहीयाय
'बचाओ गिरने से' = मला पडू देऊ नकोस, वाचव

या सर्व उदाहरणांमध्ये आवश्यक सुटू नये व अनावश्यक जोडले जाऊ नये हे पथ्य पाळत अनुवादकाने केलेले बदल व शब्दांची अचूक निवड यावरून अनुवादकाला काव्याची व भाषेची जाण आहे व त्याच्याकडे सर्जकता आहे याचा प्रत्यय देतात व काव्यानुवाद हा पुन:सर्जन असतो याची साक्ष पटवतात.

या व्यतिरिक्त बऱ्याच कवितांमध्ये वरील उपायांबरोबरच शब्दांचा तर कधी संपूर्ण वाक्याचाही क्रम बदलून गद्याची सपाट लय डावलून भावानुगामी पद्यलयीचा सुरेख समतोल साधण्याचे कसब अनुवादकाने दाखवल्याचे दिसून येते. उदाहरणार्थ,
शब्दों को छोड़ आएँगे = सोडून देऊ शब्दांना
काफी बड़े हो गए हैं = खूप मोठं झालेलं पाहून

| | |
|---|---|
| माँ मुझे पहचान नहीं पायी<br>जब मैं घर लौटा<br>सर से पैर तक धूल से सना हुआ | } डोक्यापासून पायापर्यंत धुळीने माखून<br>जेव्हा मी घरी परतलो<br>तेव्हा आईनं मला ओळखलं नाही. |





अनुक्रमणिका

| | | |
|---|---|---|
| प्रेम में बचकानापन बचा रहे<br>कवियों में बची रहे थोडी लज्जा | } | प्रेमात रहावा बालिशपणा<br>कवींमध्ये टिकून रहावी थोडी लाज |
| या एक छोटासा गड्ढा<br>जिसमें हम गिरते हैं<br>और उठकर चल देते हैं<br>जैसे कुछ हुआ ही न हो | } | किंवा एक छोटासा खड्डा<br>ज्यामध्ये आपण पडतो<br>आणि पुन्हा उठून चालू लागतो<br>जणू काही झालंच नाही असं<br>(नव्याने जोडलेले शब्द) |

अनुवादाच्या अंगाने या कवितांचा थोडा अभ्यास केल्यास सफल व चांगल्या अनुवादाचे गमक असे उलगडत जाते.

या अनुवादांमध्ये 'स्वत:वर गर्व होता', 'चिमण्यांची फडफड', 'चंद्र चमकतो', 'मानवी दुर्बलतेचा एखादा विद्वान', 'घरातील त्रस्तता', 'अनुभव साधारण होतील', 'ढग घिरट्या घालतात.', 'त्याच्या उदासीवर', 'रात्रीच्या विचित्र प्राण्यांनी वेढून' अशी काही मराठी वळण नसलेल्या भाषेची उदाहरणं सापडतील. पण ती अनवधानाने आलेली नसून निरुपायाने आलेली आहेत. अन्यथा वाचकाला कविता अस्सल मराठी तर वाटतेच. शिवाय मनाला भावते व स्पर्श करून जाते, हे या अनुवादाचे महत्त्वाचे यश म्हणावे लागेल.

कदाचित भारतीय स्तरावर पोचण्याच्या शक्यतेमुळे मराठीतून हिंदीत अनुवादित झालेल्या पुस्तकांची खूप मोठी संख्या दिसत असताना या अनुवादकाने हिंदीतून मराठीकडे येण्याची वाट वहिवाट बनविण्याच्या दृष्टीने उचललेले हे महत्त्वाचे पाऊल आहे.

हिंदी आणि मराठी भाषांमध्ये समजण्याची फारशी अडचण नसली तरी मराठी वाचक हिंदी साहित्याकडे व खासकरून कवितांकडे वळण्याच्या दृष्टीने हे अनुवाद निश्चितच उपकारक ठरतील. या भाषिक देवाण-घेवाणीच्या प्रक्रियेत भाषांची एकमेकींवर कुरघोडी, आक्रमण की विकास हे वादाचे मुद्दे बाजूला ठेवण्यास अनुवादांमुळे साहित्य, भाषा व व्यक्तिमत्त्वाचा परीघ व्यापक होण्यास मदत होईल याबाबत दुमत होण्याचे कारण दिसत नाही.

■

प्रपाठक, हिंदी विभाग, पुणे विद्यापीठ, पुणे 411 007.

पुस्तक-परीक्षण

# कथनाच्या सीमारेषांवरील साहस

हरिश्चंद्र थोरात

[परीक्षित पुस्तक : 'दामू देवबाग्याची दुनिया' डॉ. यशवंत रायकर, अयपा प्रकाशन, विरार, पृष्ठे ३३५, किंमत रु. ३४०/-]

'दामू देवबाग्याची दुनिया' हे डॉ. यशवंत रायकर यांचे २००५ साली प्रसिद्ध झालेले पुस्तक आहे. डॉ. रायकर हे पुरातत्त्व आणि इतिहास या ज्ञानक्षेत्रात वावरणारे ज्येष्ठ अभ्यासक आहेत. 'दामू देवबाग्याची दुनिया' या पुस्तकाच्या रूपाने १९३२ साली जन्माला आलेल्या रायकरांनी ललित लेखनाच्या क्षेत्रात पहिले पाऊल टाकलेले दिसते. हे पहिले पाऊल विस्मयचकित करणारे आहे. लेखकाची सत्तरी उलटून गेल्यावर हे लेखन झालेले असले तरी त्यामध्ये एक विलक्षण ताजेपणा आहे. या लेखनातून जाणवणाऱ्या वृत्तींमध्ये समकालिकता आहे. वाचकाला परिचित असलेल्या संकेतव्यूहाला ते निरर्थक करीत त्याची कसोटी पाहात राहते.

वाचत असलेले पुस्तक कोठल्या तरी साहित्यप्रकाराच्या संकेतव्यूहाजवळ आणून वाचक त्या पुस्तकाला विशिष्ट अर्थ देत असतो. त्याच्या वाचनाची आणि अर्थनिर्णयनाची रीतही यामुळेच निश्चित होत असते. वाचकाच्या या व्यवहाराला एखादे पुस्तक विरोध करू लागले, त्याच्याजवळ असलेल्या साहित्यप्रकारविषयक वर्गीकरणाला हुलकावण्या देऊ लागले, की वाचकासमोर अनेक अडचणी उभ्या राहू लागतात. त्याचे वाचन आणि समोरचे पुस्तक या दोन्ही गोष्टी अधिक गुंतागुंतीच्या होऊ लागतात. ते वाचकाचा कस पाहू लागते. दामू देवबाग्याची दुनिया हे या प्रकारचे पुस्तक आहे.

हे पुस्तक कोणत्या साहित्यप्रकारात मोडते या प्रश्नाला समाधानकारक उत्तर देता येत नाही. पुस्तकात दिलेल्या तपशिलाच्या अन्वये सदर पुस्तक 'कादंबरी' आहे. पुस्तकाच्या शेवटी 'लेखकाचे दोन शब्द' आहेत. त्यामध्ये लेखकाने या पुस्तकाचा उल्लेख 'कथन' असा केला आहे. 'कथन' ही पायघोळ संकल्पना आहे. तिच्यात इतिहासापासून कादंबरीपर्यंतच्या आणि महाकाव्यापासून चित्रपटांपर्यंतच्या अनंत गोष्टींचा समावेश होऊ शकतो. ज्येष्ठ समीक्षक गंगाधर पाटील यांच्या मते 'हे आत्मकथन अँटिऑटोबॉयॉग्राफिकल या प्रकारात मोडत असून दामू हा त्यातील






ॲंटिहीरो होय.' ('लेखकाचे दोन शब्द') 'प्रकाशकाचे निवेदन'मध्ये या पुस्तकाला अत्यंत नि:शंकपणे आत्मकथन म्हटले आहे. या पुस्तकामध्ये सांस्कृतिक संदर्भांना असलेले महत्त्वाचे स्थान लक्षात घेता, एखादा वाचक त्याला कथारूप सांस्कृतिक इतिहासही म्हणू शकेल. एकाच वेळेला कादंबरी, आत्मकथन, प्रति-आत्मकथन आणि सांस्कृतिक इतिहास म्हणून ओळखल्या जाण्याच्या क्षमता या पुस्तकामध्ये आहेत. खऱ्या वाटणाऱ्या गोष्टी या पुस्तकात अशा प्रकारे सांगितल्या आहेत, की त्यांमध्ये कल्पिताचा प्रवेश व्हावा. अनेक साहित्यप्रकारांच्या सीमारेषांवर उभे राहून, व्यामिश्रतेला जन्माला घालण्याचे साहस या पुस्तकाने केले आहे असे आपल्याला म्हणता येईल.

साहित्यप्रकारविषयक संदिग्धता बाजूला ठेवून पुस्तकाच्या तपशिलात उतरण्याचा प्रयत्न केला तर ते दामोदर नरहर जोशी म्हणजे दामू, वय वर्षे सतरा, राहणार ब्राह्मण आळी, देवबाग या कल्पित व्यक्तीचे हे आत्मकथन आहे, असे म्हणता येते. त्याच्या लेखनाला काळाचा नेमका संदर्भ आहे. १९४९ सालच्या एप्रिल महिन्यात दामूने ते लिहायला घेऊन पूर्ण केले आहे. दामूचे आजोबा जोशीअण्णा हे नोकरीचा काळ संपल्यानंतर देवबाग या आपल्या मूळ गावात येऊन राहू लागले आहेत. तेथे त्यांनी अगोदरच बंगलीवजा प्रशस्त घर बांधून ठेवले आहे. दामूचे बहुतेक आयुष्य या जोशीअण्णांच्या म्हणजे आजोबांच्या आश्रयाला गेले आहे. त्याचे वडील त्याच्या वयाच्या तेराव्या वर्षी वारले आहेत. आई तिच्या माहेरी आहे. देवबागेच्या घरात सत्ता मोठ्या प्रमाणात मावशी म्हणजे अण्णांची मेहुणी, सखुबाई म्हणजे स्वैपाकाच्या बाई आणि स्वत: अण्णा या त्रिकुटाच्या हातात आहे. दामूच्या बाबतीत ही मंडळी कर्तव्याला चुकतात असे नाही. तथापि, त्यांच्याजवळ मायेचा उमाळा नाही. या तीन म्हाताऱ्या व्यक्तींबरोबर दामू जगतो आहे.

दामू सर्वार्थाने सामान्य आहे. तो गोंधळलेला आहे. सदा दबलेला आहे. भोवतालच्या सांस्कृतिक आदर्शांसमोर आपण फारच खुजे आहोत, असे त्याला वाटते आहे. अनेक गोष्टींना तो सतत घाबरतो आहे. त्याला स्वत:चीच लाज वाटते आहे. तो सतत कोणापुढेही नम्र होत राहतो. चुका करतो. बोलणी खातो. आखून दिलेल्या वर्तुळात फिरत राहतो. दामू भोवतालच्या वास्तवाला साचेबंद, घोटून तयार केलेल्या प्रतिक्रिया देतो. तो संघाचा स्वयंसेवक आहे यात सर्व काही आले. स्वत:वर येणाऱ्या मर्यादांचे, परंपरेने निर्माण केलेल्या संकेतांचे तो अनेकदा मूढपणे समर्थनही करतो. पारंपरिक संस्कारांच्या विरोधात बंडखोरी करण्याचे चुकूनही त्याच्या मनात येत नाही. यामुळेच दामूला संघात सुरक्षित वाटते. सर्वसामान्य जगण्याचा स्तर ओलांडून पलीकडे जाण्यास दामूचा खुजेपणा व खुरटलेपणा दामूला सतत प्रतिबंध करीत राहतात. एका

परीने, तो म्हणजे तो जगत असलेल्या संस्कृतीचेच मूर्त रूप आहे.

दामूचे वय असे आहे की ज्यात मुलांच्या मनात मोठ्या प्रमाणात लैंगिक उलथापालथी घडत असतात. दामूच्या कथनामध्ये मात्र लैंगिक संदर्भ असलेले काहीही येत नाही. एकदा झोपण्यापूर्वी वारंवार लघवीला जाण्याचा उल्लेख येतो. अण्णा आणि मावशी यांच्यातील संबंधांविषयीच्या लोकवार्तेची व्यर्थता एकदा आवर्जून सांगितली जाते. धाकट्या काकाच्या बाहेरख्यालो असण्याच्या शक्यतेविषयीचे निवेदन एकदा येते. अशा काही जागा सोडल्या तर या बाबतीत आपल्या मनात काय घडते आहे याबद्दल दामू काही बोलत नाही. एका बाजूने पाहिले तर ही या पुस्तकाची मोठी उणीव म्हणता येईल. तथापि, दुसऱ्या बाजूने पाहता, भोवतालच्या संस्कृतीचे दामूवर एवढे नियंत्रण आहे की अत्यंत नैसर्गिक असे पौगंडावस्थेतील लैंगिक अनुभव त्याच्या आजूबाजूलाही फिरकू नयेत. दामूच्या मनाचा आंतरिक गाभा नैसर्गिक भावनांनी आकाराला न येता सांस्कृतिक संदर्भांनी आकाराला आल्यासारखे वाटते. यामुळे तो जसा स्वत:च्या भूतकाळात मागे मागे जाऊ लागतो, तसतसा तो त्याच्या भोवतालच्या संस्कृतीचे स्वरूप स्पष्ट करू लागतो. या प्रवासाला मानसिक खोली नाही. दामू एकपरिमाणी मुलगा आहे. भोवतालच्या संस्कृतीने त्याला तसे केले आहे. यामुळेच त्याच्या कथनामधून त्याने घेतलेल्या अनुभवांना महत्त्व येण्याऐवजी सांस्कृतिक संदर्भांना महत्त्व येते आणि त्याच्या कथनामधून अत्यंत सहजतेने सूक्ष्म तपशिलांनी भरलेले सांस्कृतिक संदर्भांचा पट निर्माण होऊ लागतो. अर्थातच या पुस्तकाचा हेतू संस्कृतीचे वर्णन करणे हा नाही. त्यामधून अत्यंत धारदारपणे केलेली संस्कृतीची चिकित्सा सादर होते. या पुस्तकाचे हे अत्यंत महत्त्वाचे वैशिष्ट्य आहे.

अवकाश, काळ आणि पात्रे या तिन्ही घटकांना कोठल्याही कथनात अत्यंत महत्त्वाचे स्थान असते. या तांत्रिक घटकांमधून कथनरूपाची उभारणी होत असते. या तिन्ही घटकांना या पुस्तकात दिले गेलेले सांस्कृतिक संदर्भांचे परिणाम एवढे महत्त्वाचे आहे की या सांस्कृतिक संदर्भांतून अवकाश, काळ आणि पात्र तिन्ही घटकांची उभारणी होते आहे, असे वाटत राहते. एवढेच नव्हे तर या तिन्ही घटकांचे परस्परसंबंधही सांस्कृतिक संदर्भांतून निर्माण होतात.

दामूने स्वत:चा पत्ता सांगितला आहे, तो 'राहणार ब्राह्मण आळी, देवबाग' असा आहे. देवबागचा निमशहरीपणा आणि ब्राह्मण आळीची संकुचितता या दोहोंनी दामूच्या ब्राह्मणपणाला आकार दिलेला आहे. पुढे हळूहळू असे अवकाशविषयक तपशील अहमहिकेने पुढे येऊ लागतात. उदाहरणार्थ, अण्णांचे घर येते. त्यातील विविध अवकाशांना दिलेले अर्थ पुढे येतात. दामूच्या वडिलांच्या नोकरीच्या भटकंतीतील विविध

गावे येतात. अलाहाबाद पात्रांच्या अंगाने येते. शेंदुर्णी हे दामूचे आजोळचे गाव येते. त्या गावाची तसेच दामूच्या मामांच्या घराची रचना तपशिलात येते. अनेक माजघरे येतात. शौचकूप येतात. दामूच्या कल्पनेतला परलोकही येतो. या साऱ्याच अवकाशांना जातिव्यवस्थेचा आणि ब्राह्मण असण्याचा संदर्भ आहे. स्वातंत्र्यपूर्व काळातील निमशहरी वातावरणातील ब्राह्मणी जीवनशैली या विविध अवकाशांच्या चित्रणातून लेखकाने मूर्त केली आहे. या अवकाशांचे कालविशिष्ट रूप अत्यंत साक्षेपाने चित्रित केल्यामुळे काल व अवकाश एकमेकांशी जोडले जातात. हे कालविशिष्ट अवकाश पात्रांच्या वर्तनावर प्रभाव गाजवत असल्यामुळे, पात्रांच्या वर्तनाला अर्थपूर्ण करत असल्यामुळे ते पात्रांशीही जोडले जातात. या सांधेजोडणीतून स्वातंत्र्यपूर्व काळातील ब्राह्मणी जीवनाचे अनेक पदर उलगडत जातात.

'दामू देवबाग्याची दुनिया' या पुस्तकातून सामोरी येणारी पात्रे वर स्पष्ट केलेल्या अवकाशात वावरतात. या पात्रांना असलेली महत्त्वाची मर्यादा 'कुटुंब' ही आहे. पुस्तकाच्या शेवटी 'दामूचे आप्त' या शीर्षकाखाली देवबाग आणि शेंदुर्णी या दोन्ही गावांकडच्या नातेवाइकांचा तक्ता दिला आहे. हे नातेवाईकच दामूच्या कथनात पात्रे म्हणून विशेषत्वाने वावरतात. कुटुंबाबाहेरची विशेष पात्रे त्याच्या कथनात येत नाहीत. येतात ती विशेष महत्त्वाची नसतात. सखूबाई तशा नातेवाईक नसल्या तरी जोशी कुटुंबाचा त्या अविभाज्य भाग आहेत. थोडक्यात, दामूच्या दुनियेतील पात्रे कौटुंबिक नातेसंबंधांच्या संकुचित मर्यादेत वावरणारी आहेत. कौटुंबिक नातेसंबंध म्हणजे संस्कृतीने मानवी संबंधाना दिलेला निश्चित अर्थ. सांस्कृतिक संदर्भांचे नियामक रूप अशा प्रकारे पात्रांच्या बाबतीतही काम करताना दिसते. कौटुंबिक संबंधांच्या वर्तुळाबाहेर पडले की माणसांची एकमेकांशी असलेली नाती अनिश्चित होऊ लागतात. संबंधांचे स्वरूप आणि वर्तनाचा आकृतिबंध या दोन्ही बाबतीत चाचपडावे लागते. पूर्वसंदर्भ नसलेले निर्णय घ्यावे लागतात. आजवर अनुभवाला न आलेले नवे काही सामोरे येण्याची शक्यता वाढते. दामूच्या दुनियेतील पात्रांच्या बाबतीत असे बहुधा होत नाही, कारण, ही पात्रे कौटुंबिक वर्तुळातच फिरत राहतात व सांकेतिक जगणे जगत राहतात. या जगण्यातील पारंपरिकता, सर्जनशीलतेचा अभाव, यांत्रिकता, संकुचितता, बेरकीपणा, हिशेबीपणा असे अनेक विशेष या पुस्तकातून जगण्याच्या सूक्ष्म तपशिलांसह उगलडत जातात. हे तपशील हे या पुस्तकाचे खास वैशिष्ट्य आहे. वेगवेगळ्या म्हणी, वाक्प्रचार, शिव्या, पोशाखाच्या पद्धती, विविध पदार्थ, घरांचे कानेकोपरे, भांडीकुंडी, दिवे, वेगवेगळी व्रते, रिवाज यांसारख्या गोष्टींपासून थेट सखुताई बाहेरच्या झाल्यानंतर येणाऱ्या संकटापर्यंत आणि विधवांना असलेल्या न्हाव्याच्या गरजेपर्यंत अनंत गोष्टी

अत्यंत सहजतेने या पुस्तकातून समोर येतात. केवळ माहिती म्हणून त्या येत नाहीत. दामूच्या व्यक्तिमत्त्वाशी आणि तो करत असलेल्या निवेदनाशी एकरूप होऊन अपरिहार्यपणे त्या समोर येतात. यामुळेच दामूच्या कथनाला दस्तऐवजाची कळा येत नाही. त्याच्या कथनाला सांस्कृतिक मानवशास्त्राला असतो तो नेमकेपणा आहे. हे प्रयत्नपूर्वक समजून घेण्याचा प्रयत्न केला, तरच वाचकाला समजते. या विशेषामुळे हे पुस्तक कल्पिताकडे अधिक झुकते. सत्याला महत्त्व देणाऱ्या आत्मकथनात दस्तऐवजाच्या स्वरूपाचा भाग आला तर समजू शकते. आत्मकथनाचा हा विशेष संदिग्ध व्हायला लागला की आत्मकथनाची कादंबरी होऊ लागते. तसे दामूच्या दुनियेबाबत झाले आहे, असे म्हणता येईल.

या पुस्तकाच्या आणखी एका विशेषामुळे त्याचा कल मोठ्या प्रमाणात कल्पिताकडे झुकला आहे. हा विशेष म्हणजे कथनातील काळाची हाताळणी होय. येथे कथनाला कालानुक्रम नाही. जे घडले ते कालानुक्रमाने सांगावे या प्रतिज्ञेने कथन साकार होत नाही. 'आमचं घर', 'दामूचं पुणं' किंवा 'दामूचा परलोक' यांसारखे विषय किंवा अण्णा, बाबा, सखूताई, मावशी यांसारखी पात्रे कथनात महत्त्वाची ठरतात. घटनांचे निवेदन येते ते या विषयांना किंवा पात्रांना प्राधान्य देऊनच. त्यामुळेच काळाला हवे तसे वाकवण्याची सोय निर्माण होते. विविध पात्रांच्या अनुषंगाने काळाची हवी तेवढी पुनरावृत्ती करता येते. कोठेही हवा तेवढा वेळ रेंगाळता येते. काळाला छेद देता येतात. अत्यंत अनपेक्षितपणे नव्या विषयाला सुरुवात करता येते. वाचकांच्या अपेक्षांना धक्के देता येतात. कथानकाच्या रचनेतील कालानुक्रमाची संगती उधळून लावून कथन अधिकाधिक लवचीक करता येते. दामूच्या दुनियेत काळाचे हे सर्व खेळ खेळले जातात. ते एवढ्या सहजतेने खेळले जातात की असे काही घडते आहे, हे वाचकाच्या लक्षातही येऊ नये. काळाची मोडतोड हे कल्पितकथेची एक महत्त्वाची खूण आहे. सांकेतिकच असला तरी वास्तवसन्मुखता आणि प्रतिरूपण या दोन्ही गोष्टींचा खऱ्याखुऱ्याशी, वास्तवाशी संबंध जोडला जातो. काळाच्या या हाताळणीमुळेही 'दामू देवबाग्याची दुनिया' कादंबरी होऊ पाहते आहे, असे म्हणता येते.

दामूच्या दुनियेमधील काळाच्या हाताळणीला आणखी एक परिमाण आहे. ते ऐतिहासिकतेचे आहे. येथील काळ विशिष्ट काळ आहे. ही कल्पित आत्मकथा १९४९च्या एप्रिलमध्ये लिहिली - तीं १९४९च्या मागे अण्णांच्या लहानपणापर्यंत म्हणजे सत्तरएक वर्षे मागे - जाते. या कालखंडाचे अनेक विशेष लेखकाने अत्यंत खुबीने कथनात पेरले आहेत. मॅट्रिकची परीक्षा संपून एस.एस.सी.ची परीक्षा सुरू होणे, स्वातंत्र्य चळवळ व देशभक्ती, राष्ट्रीय स्वयंसेवक संघ व त्याच्यावरील बंदी,

मुंबईतील चाळ-जीवन, इंग्रज साहेब अशा अनेक गोष्टी त्याच्या अनुभवविश्वाचा भाग म्हणूनच येतात. त्याच्या अनुभवक्षेत्रात नसलेली, माहितीसाठी माहिती म्हणून येणारी, एखादी गोष्ट तो चुकूनही सांगत नाही. विशिष्ट काळ तर उभा करायचा पण इतिहासाचे वस्तुनिष्ठ संभाषित टाळायचे असे धोरण लेखकाने ठेवले आहे. यामुळे दिली जाणारी माहिती अपरिहार्यतेच्या स्वरूपात सामोरी येते, तसेच ती दामूच्या व्यक्तिमत्त्वाच्या भिंगामधून वाचकापर्यंत पोहोचवली जाते. दामूची निरागसता, दामूचे रागलोभ, दामूची मते, दामूला असलेल्या मर्यादा या सर्व गोष्टींचा परिणाम दिल्या जाणाऱ्या माहितीवर झालेला आहे. वस्तुनिष्ठा हा इतिहासाच्या तसेच आत्मकथनाच्याही संभाषिताचा विशेष असतो. ती टाळून दामूची दुनिया कल्पितकथेच्या अंगाला झुकते. असे असूनही वास्तवाशी असलेले संबंध ती टाळत नाही. हे सर्व विशेष कादंबरी या साहित्यप्रकाराचे आहेत.

'दामू देवबाग्याची दुनिया' या पुस्तकातील कल्पिताची संघटना करणाऱ्या आणखी एका विशेषाकडे शेवटी लक्ष वेधावेसे वाटते. सत्तरी उलटून गेलेल्या लेखकाने सतरा वर्षे वय असलेल्या निवेदकाची केलेली निवड, व त्याच्या दृष्टीमधून केलेली दुनियेची उभारणी, या गोष्टीच मुळात कल्पिताला कथनात प्रवेश देणाऱ्या आहेत. सतरा वर्षांच्या दामूचे अनुभवविश्व आणि सत्तर वर्षांच्या लेखकाचा विशिष्ट संस्कृतीकडे पाहण्याचा चिकित्सक आणि औपरोधिक दृष्टिकोण यांचे असाधारण रसायन या पुस्तकातून वाचकाला सामोरे येते. आत्मकथनाच्या रूपबंधाचा सर्जक उपयोग येथे लेखकाने करून घेतलेला दिसतो.

अलीकडच्या काळातील मराठी कादंबरीच्या पार्श्वभूमीवर दामू देवबाग्याची दुनिया विशेष उल्लेखनीय वाटते. अलीकडच्या काळातील मराठी कादंबरी सरधोपट वास्तव-वादाचा कलाहीन वापर करताना दिसते. आत्मचरित्राच्या रूपबंधाचा उपयोग ती करते, पण या उपयोगाला सर्जक उपयोग म्हणता येणार नाही. सांगितले जाते आहे ते खरे आहे असे वाटावे या मर्यादित हेतूने मराठी कादंबरी आत्मचरित्राच्या रूपबंधाचा उपयोग करते. दामूची दुनिया मात्र या सर्व मर्यादा ओलांडून पलीकडे जाते. आत्मचरित्र, इतिहास, कल्पितकथा अशा विविध संभाषितांना ही दुनिया स्वतःच्या पंचक्रोशीत निमंत्रण देते. यासाठी तिला विविध साहित्यप्रकारांच्या सीमारेषांवर जावे लागते. हे आव्हान या 'दुनिये'ने समर्थपणे पेलले आहे. ही संभाषिते आत येताच, त्यांचे संदर्भ आपल्या अस्तित्वाला देऊन पण त्यांची पुनर्रचना करून तिने आपल्या आकारात त्यांना ढाळले आहे. या वैशिष्ट्यपूर्ण प्रक्रियेमुळे मराठी साहित्यविश्वाला अधिक समृद्ध करणारी साहित्यकृती निर्माण झाली आहे, असे खात्रीने म्हणता येते. ■

502-बी, अटलांटा, मिठागर रस्ता, कांदरपाडा, दहिसर(प.), मुंबई 68. फोन 28915067

पुस्तक-परीक्षण

# तंजावर - महाराष्ट्र अनुबंधाचा पांडित्यपूर्ण मागोवा

ब्रह्मानंद देशपांडे

[परीक्षित पुस्तक : 'तंजावर आणि महाराष्ट्र - साहित्य व शोध'. डॉ. माणिक धनपलवार, प्रकाशक : सुशील धनपलवार, हैदराबाद, पृष्ठे २०४, किंमत १५० रु.]

'तंजावर आणि महाराष्ट्र - साहित्य व शोध' हा डॉ. माणिक धनपलवार यांच्या लेखांचा संग्रह आहे. यात सतरा मराठी आणि तीन इंग्रजी लेख आहेत. यातील पाच मराठी लेख तंजावर आणि तेथील प्रख्यात सरस्वती-महालातील अफाट ग्रंथसंपदेविषयी आहेत. परिशिष्टात देण्यात आलेल्या इंग्रजी लेखांपैकी एक एकूणच दाक्षिणात्य परंपरांविषयी आणि दुसरा तंजावरच्या मराठी नाटकांविषयी आहे. उर्वरित लेख दाक्षिणात्य संत, दाक्षिणात्य शब्दांची अर्थनिश्चिती, आरे मराठी भाषा आदि विषयांवर आहेत. अर्थात् ग्रंथाचे नाव हे पहिल्या पाच आणि शेवटच्या दोन शोधनिबंधांवरून ठेवले गेले आहे.

यातील पहिला लेख 'ऐसी तंजापुरी देखिली' हा अतिशय हृद्य आहे. तंजावर येथील शांत वातावरण, त्या प्राचीन वैभवशाली राजधानीच्या अवशेषखुणा यांचे अतिशय मनोहारी वर्णन लेखकाने केले आहे. तंजावरच्या सरस्वती-महालात दहा ते पाच सतत कार्यरत असलेले भीमराव - समर्थ रामदासांनी तंजावरला स्थापिलेल्या भीमस्वामी मठाचे अधिपति - तर अगदी डोळ्यासमोर उभे राहतात. तसेच दुसरे एस्. गणपतिराव. तंजावरच्या चोळ राजाचे प्रधान अनिरुद्ध ब्रह्मरायर हे महाराष्ट्रीय होते असे त्यांचे मत होते. त्यासाठी त्यांनी दिलेली प्रमाणे डॉ. धनपलवार विसरले ही इतिहास-अभ्यासकांच्या दृष्टीने खेदाची गोष्ट आहे. याच लेखात एका मराठा वतनदाराची कथा येते. त्यांच्या घराण्याला हैदराबादच्या निजामाने विदर्भात काही भूमी दिली होती. त्याविषयी ते काय बोलले, त्यातून त्यांचा निग्रह व अभिमान कसा प्रकट झाला याचा काहीच खुलासा धनपलवार देत नाहीत (पृ. १२). मात्र हा लेख तंजावरची अशी काही ओळख करून देतो की कुठल्याही संशोधकाला तंजावरची अनिवार ओढ लागावी. तिथल्या मंडळींनी ज्या कसोशीने मराठी संस्कृती जपली आहे ते वाचून आपण थक्क होतो.

'तंजावरचा मराठी - कानडी सहयोग' हा लेख सखोल अभ्यासावर आधारलेला आहे. तंजावरची कन्नड बाजारपेठ, विजापूरहून कन्नड भाषकांचे तंजावरला स्थलांतरण, त्यांची बदामी (वातापि नगरी) बनशंकरी आणि सन्नति (जिल्हा गुलबर्गा) ही कुलदैवते, सरस्वती-महालातील बाडात आढळणारी  कन्नड-मराठी मिश्र पदे, कन्नड भाषी राम कवीचा 'भाषाप्रकाश', आदिंचा उल्लेख महत्त्वाचा आहे. या कवीचे कुलदैवत कोळे नरसिंहपुर. धनपलवार यांच्या मते ते कर्नाटकातील हासन जिल्ह्यातील होळे नरसिंहपुर. तमिळ भाषेत 'ह' चा 'क' होतो. याची उदाहरणे त्यांनी दिली आहेत. मात्र सांगली जिल्ह्यात मच्छिंद्रगड खाली कोळे नरसिंहपुर नामक गाव आाहे. तेथे नरसिंहाची अतिशय सुंदर मूर्ती भुयारात आहे. ते अनेक कुटुंबांचे कुलदैवत आहे. पुणे जिल्ह्यातील नीरानरसिंहपूर हेही अनेक कन्नड कुटुंबांचे कुलदैवत आहे.

'तंजावरच्या आख्यान काव्यातील रसाविष्कार' हा लेख तंजावरच्या आख्यान काव्यातील विविध रसांच्या वर्णनांचे विवेचन करणारा आहे. यातील विप्रज जनार्दनाने केलेले एका ओसाड नगरीचे वर्णन तर अतिशय प्रत्ययकारी आहे. (पृ. ४१-४२). 'तंजावरच्या मराठी साहित्यातील सामाजिकता' हा लेख असाच नेटका उतरला आहे. जर्मन मिशनरी श्वार्ट्झ याचे ख्रिश्चन धर्मप्रसाराचे प्रयत्न, त्याची निराशा, तंजावरची बहुभाषिक संस्कृती, अर्काटच्या नबाबाची सतत आक्रमणे, मुस्लिमांचे अत्याचार यांचे प्रतिबिंब या साहित्यात उमटले आहे. तुळजाराजे (दुसरे) यांनी कंपनी सरकारला दिलेल्या प्रदीर्घ निवेदनातील, 'मी माझ्या प्राणाची आहुती देईन; पण प्रजेला एका निर्दय मुसलमान सत्ताधीशाच्या छळाला बळी पडू देणार नाही' हे बाणेदार निषेध-वचन (पृ. ५८) या छळाची कहाणी सांगते.

या संग्रहातील अतिशय महत्त्वाचा लेख आहे 'नकलांच्या खेळाचे तंत्र'. धनपलवार यांना सरस्वती-महाल ग्रंथालयात गवसलेल्या एका हस्तलिखित बाडात नकलांच्या खेळाचे प्रयोग, त्याची सिद्धता, साहित्य याचे तपशीलवार वर्णन मिळाले. हस्तलिखित 'विकट अथवा नकल्या' ह्या शीर्षकाचे आहे आणि लेखक आहे डौरे केशवनाथ. येथे नकल्यासाठी 'विकट' हा शब्द आला आहे. [आश्चर्याची गोष्ट अशी की बिहार प्रांतातील मैथिल प्रदेशातही विदूषकाला अथवा नकल्याला बिकटा असेच म्हणतात. (फणीश्वरनाथ 'रेणु', मैला आँचल, ११वी आवृत्ती, पृ. ६३, राजकमल प्रकाशन] हा सगळाच लेख अतिशय महत्त्वाचा आणि विडंबन नाट्याच्या तांत्रिक अंगावर प्रकाश टाकणारा आहे.

'तंजावरचे कोरीव लेख आणि संभाजी' या लेखाने इतिहासाच्या अभ्यासकांना मनापासून आनंद वाटेल. औरंगजेबाच्या आक्रमणाच्या मगरमिठीत असतानाही संभाजी





अनुक्रमणिका

पुस्तक-परीक्षण

# तंजावर - महाराष्ट्र अनुबंधाचा पांडित्यपूर्ण मागोवा

ब्रह्मानंद देशपांडे

[परीक्षित पुस्तक : 'तंजावर आणि महाराष्ट्र - साहित्य व शोध'. डॉ. माणिक धनपलवार, प्रकाशक : सुशील धनपलवार, हैदराबाद, पृष्ठे २०४, किंमत १५० रु.]

'तंजावर आणि महाराष्ट्र - साहित्य व शोध' हा डॉ. माणिक धनपलवार यांच्या लेखांचा संग्रह आहे. यात सतरा मराठी आणि तीन इंग्रजी लेख आहेत. यातील पाच मराठी लेख तंजावर आणि तेथील प्रख्यात सरस्वती-महालातील अफाट ग्रंथसंपदेविषयी आहेत. परिशिष्टात देण्यात आलेल्या इंग्रजी लेखांपैकी एक एकूणच दाक्षिणात्य परंपरांविषयी आणि दुसरा तंजावरच्या मराठी नाटकांविषयी आहे. उर्वरित लेख दाक्षिणात्य संत, दाक्षिणात्य शब्दांची अर्थनिश्चिती, आरे मराठी भाषा आदि विषयांवर आहेत. अर्थात् ग्रंथाचे नाव हे पहिल्या पाच आणि शेवटच्या दोन शोधनिबंधांवरून ठेवले गेले आहे.

यातील पहिला लेख 'ऐसी तंजापुरी देखिली' हा अतिशय हृद्य आहे. तंजावर येथील शांत वातावरण, त्या प्राचीन वैभवशाली राजधानीच्या अवशेषखुणा यांचे अतिशय मनोहारी वर्णन लेखकाने केले आहे. तंजावरच्या सरस्वती-महालात दहा ते पाच सतत कार्यरत असलेले भीमराव - समर्थ रामदासांनी तंजावरला स्थापिलेल्या भीमस्वामी मठाचे अधिपति - तर अगदी डोळ्यासमोर उभे राहतात. तसेच दुसरे एस्. गणपतिराव. तंजावरच्या चोळ राजाचे प्रधान अनिरुद्ध ब्रह्मरायर हे महाराष्ट्रीय होते असे त्यांचे मत होते. त्यासाठी त्यांनी दिलेली प्रमाणे डॉ. धनपलवार विसरले ही इतिहास-अभ्यासकांच्या दृष्टीने खेदाची गोष्ट आहे. याच लेखात एका मराठा वतनदाराची कथा येते. त्यांच्या घराण्याला हैदराबादच्या निजामाने विदर्भात काही भूमी दिली होती. त्याविषयी ते काय बोलले, त्यातून त्यांचा निग्रह व अभिमान कसा प्रकट झाला याचा काहीच खुलासा धनपलवार देत नाहीत (पृ. १२). मात्र हा लेख तंजावरची अशी काही ओळख करून देतो की कुठल्याही संशोधकाला तंजावरची अनिवार ओढ लागावी. तिथल्या मंडळींनी ज्या कसोशीने मराठी संस्कृती जपली आहे ते वाचून आपण थक्क होतो.

'तंजावरचा मराठी - कानडी सहयोग' हा लेख सखोल अभ्यासावर आधारलेला आहे. तंजावरची कन्नड बाजारपेठ, विजापूरहून कन्नड भाषकांचे तंजावरला स्थलांतरण, त्यांची बदामी (वातापि नगरी) बनशंकरी आणि सन्नति (जिल्हा गुलबर्गा) ही कुलदैवते, सरस्वती-महालातील बाडात आढळणारी कन्नड-मराठी मिश्र पदे, कन्नड भाषी राम कवीचा 'भाषाप्रकाश', आदिंचा उल्लेख महत्त्वाचा आहे. या कवीचे कुलदैवत कोळे नरसिंहपुर. धनपलवार यांच्या मते ते कर्नाटकातील हासन जिल्ह्यातील होळे नरसिंहपुर. तमिळ भाषेत 'ह' चा 'क' होतो. याची उदाहरणे त्यांनी दिली आहेत. मात्र सांगली जिल्ह्यात मच्छिंद्रगड खाली कोळे नरसिंहपुर नामक गाव आाहे. तेथे नरसिंहाची अतिशय सुंदर मूर्ती भुयारात आहे. ते अनेक कुटुंबांचे कुलदैवत आहे. पुणे जिल्ह्यातील नीरानरसिंहपूर हेही अनेक कन्नड कुटुंबांचे कुलदैवत आहे.

'तंजावरच्या आख्यान काव्यातील रसाविष्कार' हा लेख तंजावरच्या आख्यान काव्यातील विविध रसांच्या वर्णनांचे विवेचन करणारा आहे. यातील विप्रज जनार्दनाने केलेले एका ओसाड नगरीचे वर्णन तर अतिशय प्रत्ययकारी आहे. (पृ. ४१-४२). 'तंजावरच्या मराठी साहित्यातील सामाजिकता' हा लेख असाच नेटका उतरला आहे. जर्मन मिशनरी श्वार्ट्झ याचे ख्रिश्चन धर्मप्रसाराचे प्रयत्न, त्याची निराशा, तंजावरची बहुभाषिक संस्कृती, अर्काटच्या नबाबाची सतत आक्रमणे, मुस्लिमांचे अत्याचार यांचे प्रतिबिंब या साहित्यात उमटले आहे. तुळजाराजे (दुसरे) यांनी कंपनी सरकारला दिलेल्या प्रदीर्घ निवेदनातील, 'मी माझ्या प्राणाची आहुती देईन; पण प्रजेला एका निर्दय मुसलमान सत्ताधीशाच्या छळाला बळी पडू देणार नाही' हे बाणेदार निषेध-वचन (पृ. ५८) या छळाची कहाणी सांगते.

या संग्रहातील अतिशय महत्त्वाचा लेख आहे 'नकलांच्या खेळाचे तंत्र'. धनपलवार यांना सरस्वती-महाल ग्रंथालयात गवसलेल्या एका हस्तलिखित बाडात नकलांच्या खेळाचे प्रयोग, त्याची सिद्धता, साहित्य याचे तपशीलवार वर्णन मिळाले. हस्तलिखित 'विकट अथवा नकल्या' ह्या शीर्षकाचे आहे आणि लेखक आहे डौरे केशवनाथ. येथे नकल्यासाठी 'विकट' हा शब्द आला आहे. [आश्चर्याची गोष्ट अशी की बिहार प्रांतातील मैथिल प्रदेशातही विदूषकाला अथवा नकल्याला बिकटा असेच म्हणतात. (फणीश्वरनाथ 'रेणु', मैला आँचल, ११वी आवृत्ती, पृ. ६३, राजकमल प्रकाशन] हा सगळाच लेख अतिशय महत्त्वाचा आणि विडंबन नाट्याच्या तांत्रिक अंगावर प्रकाश टाकणारा आहे.

'तंजावरचे कोरीव लेख आणि संभाजी' या लेखाने इतिहासाच्या अभ्यासकांना मनापासून आनंद वाटेल. औरंगजेबाच्या आक्रमणाच्या मगरमिठीत असतानाही संभाजी

महाराजांनी चिदंबरच्या नटराज मंदिरासाठी धर्मकृत्ये केली हे वाचून आपण थक्क होतो. तंजावर प्रांतातील विठ्ठलभक्तीची धारा, तंजावर-कोकण संबंध आदि अनुबंध धनपालवारांनी उलगडून दाखविले आहेत.

धनपालवार पट्टीचे भाषा-कोविद आहेत. 'महाराष्ट्र प्रयोगचंद्रिका-एक अध्ययन' 'काही दाक्षिणात्य शब्दांची अर्थनिश्चिती' या लेखांमधून त्यांचा सखोल व्यासंग प्रकट झाला आहे. बैकार (वाग्गेयकार), चुकुर (चकित होणे), कर्मरी (दरी) यावरचे विवेचन अभ्यासपूर्ण आहे. (मात्र गाथा सप्तशतीत गाथा क्र. ५५मध्ये करिमरी हा शब्द बंदिनी, बंदी स्त्री या अर्थी आला आहे एवढे नोंदवितो. तो या संदर्भात अप्रस्तुत आहे हे उघड आहे.)

डॉ. श्री.रं. कुलकर्णी यांचा आंध्रातील मराठी समाजाविषयीचा 'आरे मराठी समाज - भाषा आणि संस्कृती' हा ग्रंथ प्रख्यातच आहे. या ग्रंथाविषयीचा धनपलवार यांचा चिकित्सक अभ्यास 'आरे मराठीची रूपमीमांसा' या लेखात आला आहे. कुलकर्णी आरे मराठीला अपभ्रंश भाषेची बोली मानतात हे धनपलवार यांना मान्य नाही. आरे बोलीवर तेलुगूचा अजिबात प्रभाव नाही हे कुळकर्णी यांचे मत त्यांनी सप्रमाण खोडून काढले आहे त्यासाठी त्यांनी आरे मराठीतील तेलुगु क्रियापदांची उदाहरणे दिली आहेत. यातील 'आंबुधणे' (हाताला पोचणे - धनपलवार) हे क्रियापद मला चिंत्य वाटते. धनपलवारांचा जन्म उमरी (जिल्हा नांदेड) गावचा. त्या भागात हा शब्द नित्य वापरात आहे. (खर्च लय होता. ते आमचा हात आबडला नाही.) लीळाचरित्रात 'आंबुथणे - 'आंबुथा' अशी रूपे येतात. श्रीचक्रधरस्वामी निकळंक येथे असता दिवा विझत होता. स्वामींच्या सांगण्यानुसार 'बाइसे पुढा गेली : वाति आंबुथिली:' (लीळाचरित्र, संपा. वि.भि. कोलते, तिसरी आवृत्ती, पूर्वार्ध लीळा ५६८, ५७३ इ.). सिरकणे हे क्रियापद आरे मराठीत येते. त्याचा अर्थ जाणे, होणे असा धनपलवार देतात. (वर्षे सरकली - वर्षे गेली) विदर्भात 'गेला' या अर्थी सरकला असा प्रयोग प्रचलित आहे.

या संग्रहातील इतर लेख तंजावर व भाषाशास्त्र याविषयी नाहीत; पण तेही अभ्यसनीय आहेत. परिशिष्टातील इंग्रजी लेख पाहिल्यावर धनपलवारांचे इंग्रजीवरचे प्रभुत्व लक्षात येते. धनपलवारांची ही 'माणिके' संग्रहणीय आहेत यात शंका नाही.

■

'ऐतिहासिक' 14, अनुपम वसाहत, श्रेयनगर, औरंगाबाद 431005
दूरध्वनी 2336606

पुस्तक-परीक्षण

# वृत्तिगांभीर्याचा अभाव

**विद्यागौरी टिळक**

[परीक्षित पुस्तक : 'वऱ्हाडी लोकभाषा / भाषाशास्त्रीय अभ्यास', प्रतिमा इंगोले, सोनल प्रकाशन, दर्यापूर, जि. अमरावती, पृष्ठे १६०, किंमत रु. १००/-]

समोर आलेल्या प्राण्याला तोंडवळ्यावरून एका प्राणिजातीत टाकावे आणि पुढे पाहू जाता वेगळाच प्राणी दिसावा, अशा नमुन्यांचे जीव देशीविदेशी पुराणांमध्ये रेखाटलेले आढळतात. प्रतिमा इंगोले यांचे 'वऱ्हाडी भाषा' हे 'भाषाशास्त्रीय अभ्यास' या उपशीर्षकाचे पुस्तक त्या कल्पनाचित्रांचे स्मरण करून देणारे आहे.

मुखपृष्ठावरील नावावरून काही अपेक्षा धरून वाचायला लागल्यावर बरेचदा अडखळायला होते आणि असे का होते आहे याचा उलगडा समारोपात, अमरावती विद्यापीठांर्गत पाच जिल्ह्यांमधील लोकगीतांच्या अभ्यासाचा हा प्रयत्न आहे, हा मजकूर वाचल्यावर होतो.

लोकगीते, म्हणी, वाक्प्रचार यांच्या भाषेचा 'लोकभाषा' म्हणून अभ्यास करणे महत्त्वाचे आहे, यात शंका नाही. त्या दृष्टीने प्रस्तुत पुस्तकाचे यथोचित मूल्यमापन लोकसाहित्याचे अभ्यासक करू शकतील. सदरहू परीक्षण मुखपृष्ठ व अन्यत्र चार पृष्ठांवर आलेल्या उपशीर्षकामुळे (ते सर्वत्र आलेले नाही.) आणि भाषाशास्त्राशी संबंधित दिसणाऱ्या मजकुरामुळे लिहिलेले आहे.

पुस्तकाच्या सुरुवातीला अमरावती विद्यापीठास सादर केलेल्या प्रबंधातील ही तीन प्रकरणे असल्याचे नमूद केले आहे. 'वऱ्हाडचा इतिहास व स्वातंत्र्यपूर्व काळातील वऱ्हाडी', 'लोकभाषा-संस्कृती' व 'वऱ्हाडीचे प्रादेशिक भेद' अशी ही तीन प्रकरणे असून 'समारोप - वेगळी भूमिका' या नावाने अखेरीचा भाग येतो.

भाषाशास्त्रीय अभ्यास म्हटल्यावर विशिष्ट स्थळकाळातील भाषेचे (वर्तमानकाळातील असल्यास मौखिक) अनेक नमुने गोळा करावयाचे आणि त्यांचे पद्धतशीर विश्लेषण करून भाषेच्या विविध अंगांविषयीची निरीक्षणे व निष्कर्ष नोंदवायचे, अशा स्वरूपाचा अभ्यास अपेक्षित असतो. उपरोक्त प्रकरणांची नावे भाषाभ्यासाशी संबंधित असली तरी पहिल्या दोन प्रकरणांमध्ये वाङ्मयीन, सांस्कृतिक

इतिहासासंबंधीची माहिती मुख्यत्वे दिसते. वऱ्हाडीचे प्रादेशिक भेद सांगताना आधाराला लोकगीतांचे, म्हणींचे संग्रह, संत गाडगेबाबांच्या कीर्तनातील उतारा अशी अभ्याससामुग्री आहे, असे दिसते. वर्तमान वऱ्हाडीचे स्वरूप स्पष्ट होण्याच्या दृष्टीने ती सदोष व अपुरी आहे. प्रस्तुत प्रकरणाच्या शेवटी - 'वऱ्हाडी भाषेच्या भाषाशास्त्रीय अभ्यासाची आज नितांत गरज आहे' असा एक निष्कर्ष सांगून पुढे 'वऱ्हाडी भाषेतील ध्वनींचे आणि अर्थवाहक घटकांचे कार्य वाटेल तसे चाललेले नसून तत्त्वानुसारीच आहे हे नक्की !' असेही बजावलेले आहे.

अशा तऱ्हेचे निष्कर्ष (!) किंवा याच प्रकरणातला बहिणाबाई चौधरींची भाषा वऱ्हाडीच आहे, असे सिद्ध करण्याचा खटाटोप पाहात असताना भाषाविज्ञान वा बोलीविज्ञान या दोन्हींचा पुरेसा आधार या अभ्यासाला नाही, हे जाणवते. संदर्भसूचीमधल्या एकूण ६८ संदर्भांपैकी फक्त सात भाषाभ्यासाशी संबंधित आहेत, हेही त्यादृष्टीने अन्वर्थक आहे.

त्यामुळे या पुस्तकात विविध विधाने येतात ती उदाहरणार्थ अशी -

'काळाच्या दृष्टीने विचार केला तर महाराष्ट्री प्राकृतानंतर अपभ्रंश व नंतर मराठी भाषा असा क्रम दिसेल' (पृ. २७)

'यादवकालीन वऱ्हाडी आणि यादवकालीन मराठी ह्या एकच भाषा होत्या.' (पृ. ३८)

'वऱ्हाडी लोकभाषेपासूनच संस्कृत भाषा उत्क्रांत झाली.' (पृ. ९२)

'वऱ्हाडी ही आजच्या विदर्भाची लोकभाषा आहे.' (पृ. ९२)

'पूर्वीच्या वऱ्हाडी लोकभाषेत साहित्य निर्माण झाले आहे. उदाहरणार्थ - जैन साहित्य व गाथासप्तशती.' (पृ. ९२)

डॉ. विश्वनाथ खैरे यांनी मराठीचे मूळ द्राविडी भाषेत असल्याचे म्हटले आहे. कदाचित द्राविडी भाषांचे मूळ वऱ्हाडीत असल्याचेही अभ्यासाने सिद्ध होऊ शकेल. (पृ. १११)

या सर्वांची संगती लावणे कठीण आहे. 'वऱ्हाडी' म्हणून संबोधल्या जाणाऱ्या भाषेला स्थलकालाची काही चौकट असू शकते, असे येथे जणू गृहितकच नाही. या तर्कानुसार कुठलाही बोलीभाषक आपल्या बोलीचे मूळ आदिमानवाच्या बोलीपर्यंत नेऊन भिडवू शकेल. आणि आपल्या बोलीभाषेपासूनच जगातल्या सर्व भाषा उत्क्रांत झाल्या असे म्हणू शकेल, हे वेगळेच !

'वऱ्हाडीचे प्रादेशिक भेद' या पृ. ९९ ते १४६ मध्ये आलेल्या प्रकरणामध्ये काही भाषिक विशेषांची नोंद येते. परंतु ऐतिहासिक, सांस्कृतिक माहितीपर तपशिलांचा भरणा यातही आहे. प्रबंधांमध्ये भरपूर अवतरणे देत राहण्याची जी प्रथा आहे, तिचा अनाठायी वापरही आहे. त्यामुळे एकदा वऱ्हाडीचा अभ्यास झालेला नाही असे

सुरुवातीस सांगूनही प्रदेशानुसार विवेचन करतानाही पुन्हापुन्हा तेच विस्कळीत पद्धतीने सांगितलेले दिसते. उदा० 'सीमावर्ती वऱ्हाडी'बद्दल लिहिताना पहिल्या परिच्छेदात आंध्रप्रदेश शेजारी असल्याने द्राविड भाषेचा परिणाम होणे सहज स्वाभाविक आहे हे म्हणताना पृ. १११वरील उपरोल्लेखित विधान केले आहे. आणि पुढे 'पण मुळात वऱ्हाडीचा अभ्यासच झाला नाही,' 'हे ढळढळीत सत्य' नोंदवले आहे.

त्यानंतर वऱ्हाडातील जातीजमाती व त्यांच्या लोकगीतांतील प्रतिबिंबाचा विचार येतो. त्यातून तेलंगणातून मोठ्या प्रमाणात लोक आलेले आहेत, असे प्रतिपादन करीत तेलगू-मराठी संबंधांवरील शं.गो. तुळपुळे व वसंत वऱ्हाडपांडे यांच्या मतांची चर्चा केलेली आहे. गोंडी भाषेचा वऱ्हाडीच्या वाक्यरचनेवर प्रभाव असावा, हे डॉ. वऱ्हाडपांडे यांचे मत ग्राह्य वाटते, असे नोंदवले आहे. पण त्यासाठी काही उदाहरणे देऊन कारणे स्पष्ट करणे, हा प्रकार नाही. त्याऐवजी पुन्हा वऱ्हाडचा इतिहास, त्याच्या अभ्यासाकडे झालेले दुर्लक्ष, वऱ्हाडी लोकांची अल्पसंतुष्टता इ. मुद्देच येत राहतात. त्या भरात 'कितीतरी लेख वा शिलालेख संशोधनाची वाट बघत आहेत.' असे विधान (पृ. ११३) आणि पुढच्या पानावर 'वऱ्हाडात लेख वा शिलालेख विशेष उपलब्ध झालेले नाहीत...' असे त्याला छेद देणारे विधान असा प्रकार होतो. पुढे 'वाक्यरचना' असे उपशीर्षक आलेले आहे. यात वाक्यरचनेचा एकच विशेष नोंदवलेला दिसतो: ''वऱ्हाडी स्त्रियांच्या जुन्या पिढीत प्रथम पुरुषी (अधोरेखन माझे) वाक्यरचना करण्यात येते.''

'प्रथम पुरुषी' भाषिक प्रयोग आणि पुंल्लिंगी क्रियापदाचा वापर यांच्यात होणारी ही गफलत 'भाषेची व्याकरणिक व्यवस्था समजावून घेण्यातला घोटाळा' एवढ्यावर सोडून द्यावी, अशी नाही. जेव्हा 'भाषाशास्त्रीय अभ्यास' म्हणून आपण काहीतरी मांडू पाहतो, तेव्हाही त्या अभ्यासाची शिस्त जाणून न घेण्याचा तो बेफिकीरपणा वाटतो. त्यामुळे 'सीमावर्ती वऱ्हाडी' या बोलीरूपाबद्दलचे विवेचन अशाच ऐतिहासिक, सांस्कृतिक चर्चेत पुढेही घोटाळते आणि अखेरीला 'सीमावर्ती वऱ्हाडी' आणि 'प्रमाण मराठी' असे उतारे तुलनेला देऊन संपते. गोंडीचा प्रभाव 'पाटणबोरी'च्या नमुन्यावर दिसतो, असे सांगितलेले आहे, पण तो कसा, कोणत्या भाषिक घटकांवर पडला आहे, याचे विश्लेषण येत नाही.

'पूर्णापट्टीची वऱ्हाडी', 'मराठवाड्यालगतची वऱ्हाडी', 'मध्यप्रदेशालगतची वऱ्हाडी', 'खानदेशालगतची वऱ्हाडी', अशीही बोलीरूपे विचारार्थ घेतलेली आहेत. त्यासाठी एकच उतारा घेऊन तो विविध लोकांकडून त्यांच्या बोलीत करून घेतलेला दिसतो. एवढ्या एका उताऱ्यावरून आणि लोकगीतांवरूनच हे प्रादेशिक भेद अभ्यासले

किंवा काय, उतारा निवडताना काय दृष्टी ठेवली वगैरे कशाचा स्पष्ट उलगडा कुठे केलेला नाही. हे प्रादेशिक भेद उलगडण्यासाठी अभ्यासाची काही चौकट स्वीकारली आहे, असे फारसे जाणवतच नाही. काही ठिकाणी व्याकरणिक विशेषांचे स्पष्टीकरण येते, काही ठिकाणी ते अजिबात नाही. जिथे ते आहे, तिथेही नेमकेपणा, संगती नाही.उदा० 'संस्कृत-प्राकृत-अपभ्रंश-देशी भाषा' अशी घडण नाकारणारे विवेचन ठिकठिकाणी येते. आणि 'तरीही सर्वसामान्य वऱ्हाडीचे व्याकरणविशेष' (पृ. १३५) मांडताना 'वऱ्हाडीत हे स्वर प्राकृत अपभ्रंशद्वारा आले आहेत,' असे सांगितले जाते. उच्चारणप्रक्रिया, व्याकरणिक प्रत्यय, शब्दसंग्रह असे काही वर्गीकरण न करता जसे सुचले तसे विशेष दिले, असा ग्रह होतो. त्यामुळे बोलीभाषेचे अपेक्षित ते चित्र नेटकेपणाने पुढे येऊ शकत नाही, ही यातली खेदाची बाब !

असे असूनही लेखिकेने वऱ्हाडी बोलीवरच्या आधीच्या अभ्यासांना तुटपुंजे ठरवत आपण पहिला प्रयत्न केल्याचा दावा केलेला आहे. समारोपात आपण 'रूढ पायंडे' काही वेळा बाजूला ठेवल्याचेही त्या सांगतात, तसेच तेथे मुख्यतः लोकसाहित्याच्या अंगानेच हा अभ्यास असल्याचेही सांगितले आहे. मूळ प्रबंधाचे शीर्षक काय होते आणि प्रस्तुत पुस्तकात समाविष्ट न झालेली प्रकरणे किती व कोणती याचा खुलासा या पुस्तकावरून होत नाही. मात्र निराळ्याच दृष्टिकोणातून झालेल्या अभ्यासाचा काही भाग 'भाषाशास्त्रीय अभ्यास' म्हणून इथे आलेला आहे, असे दिसते.

तसा तो मांडताना, एकीकडे कुलनिष्ठ अभ्यास चौकट स्वीकारणाऱ्या अभ्यासकांची मते सोयीनुसार आधाराला घेतली आहेत, तर दुसरीकडे ती मुळातच नाकारणाऱ्यांचाही आधार घेतला आहे. प्रस्थापित चौकटी धुडकावताना वा त्यांचा सोयीनुसार मेळ घालताना नवी चौकट पुरवण्याची जबाबदारी येते. तशी ती पुरविता न येणेही समजू शकते, पण जे काही केले आहे त्यामधून वृत्तिगांभीर्य आणि मेहनतीची तयारी एवढे तरी अपेक्षित असते. प्रतिमा इंगोले या उत्तम कथाकार आहेत. त्यांच्यापाशी हौस व उत्साह भरपूर आहे असे जाणवते. त्यामधून भाषाभ्यासाच्या क्षेत्रात काही खरोखरीच मौलिक भर पडायची असेल तर त्यांनी या गोष्टींचा गंभीरपणे विचार करावा असे कळकळीने सुचवावेसे वाटते.

■

मराठी विभाग, पुणे विद्यापीठ, पुणे 411 007.

**महत्त्वाची सूचना :**

'भाषा आणि जीवन'च्या वार्षिक वर्गणीदारांनी नव्या वर्षाची वर्गणी पाठवावी. वर्गणीचे तपशील आवरणपृष्ठ 'तीन'वर आहेत.





अनुक्रमणिका

पुस्तक-परीक्षण

# यंत्रालय ज्ञानकोशाची निर्मिती

सदाशिव देव

[परीक्षित पुस्तक : 'कथा यंत्रालय ज्ञानकोशाची'. शंकर गोपाळ भिडे, प्रकाशक : नीला चंद्रशेखर रिसबूड, दापोली (२००७) पृष्ठे : ११४]

'भाषा आणि जीवन' (वर्ष २३, अंक १, हिवाळा २००५)मध्ये 'यंत्रालयाचा ज्ञानकोश' (लेखक : शं.गो. भिडे) या कोशग्रंथाचे परीक्षण मी केले होते. या कोशग्रंथाच्या निर्मितीपासून प्रकाशनापर्यंतच्या घटनांची नोंद श्री. भिडे यांनी आता 'कथा यंत्रालय ज्ञानकोशाची' या पुस्तकात केली आहे.

माणसाला काही खास सांगण्यासारखे अनुभव मिळाले की ते अनेकांना सांगावेत असे वाटते. पण मनात आले तरी ते प्रत्यक्षात लिहून काढणे व प्रसिद्ध करणे ही कार्यसिद्धी फारच थोड्या लोकांना साधता येते. याला कारण आलेले अनुभव तेवढे प्रौढ, घन स्वरूप नसतात. पुस्तकस्वरूपात लिहून ते प्रसिद्ध करण्यासाठी लागणारे अवसान घटत जाते. श्री. शंकर गोपाळ भिडे यांच्या बाबतीत मात्र असे काही झाले नाही. त्यांनी उमेदीने हे पुस्तक लिहून प्रसिद्ध केले याबद्दल त्यांचे मी अभिनंदन करतो. लेखन करू इच्छिणाऱ्या नवीन दमाच्या तरुणांना हे पुस्तक प्रेरणादायक वाटेल असे मला वाटते.

श्री. भिडे यांच्या या पुस्तकाची ओळख करून देण्याची दोन कारणे आहेत. पहिले कारण, त्यांचा 'मंत्रालयाचा ज्ञानकोश' हा तंत्रज्ञान क्षेत्रातील, मराठी भाषेतील पहिलाच भारदस्त ग्रंथ होय. त्यांच्या या लेखनामुळे मराठी भाषा समृद्ध झाली. दुसरे कारण म्हणजे ही कथा 'ग्रंथलेखनाचा इतिहास' या वाङ्मयप्रकारात समाविष्ट होते. मराठीत ग्रंथलेखन विपुल प्रमाणात होते; पण ग्रंथलेखनासाठी लेखकाला झालेली प्रेरणा, आलेल्या अडचणी, मिळालेले सहकार्य यांचा इतिहास मराठी भाषेत फारच अपुरा आहे. श्रीधर व्यंकटेश केतकरांनी 'महाराष्ट्रीय ज्ञानकोश' १९२७च्या सुमारास प्रसिद्ध केला व नंतर त्यांनीच 'ज्ञानकोश मंडळाचा इतिहास' या नावाचा ग्रंथ प्रसिद्ध केला. हे पुस्तक त्या वेळी फार गाजले. इंग्रजी भाषेत मात्र ग्रंथ-लेखनाचा इतिहास हा एक समृद्ध वाङ्मयप्रकार आहे. 'बुकबायर', 'बुकमन', 'लिव्हिंग एज', 'नेशन',

'मेण्टर' अशी डझनभर नियतकालिके यासाठीच प्रसिद्ध आहेत.

श्री. भिडे यांना आपल्या ज्ञानकोशाच्या निर्मितीची कथा अशीच सांगावीशी वाटली. भारतात औद्योगिक क्रांती व्हावी यासाठी कोणती साधने निर्माण झाली पाहिजेत याचा त्यांनी विचार केला. त्यापैकी एक अडचण म्हणजे या क्षेत्रातील अपुरी ग्रंथरचना होय. त्यांनी मराठीतून 'यंत्र'ज्ञानावर १७ लहानमोठी पुस्तके लिहिली हे सांगूनही खरे वाटणार नाही. अशी पुस्तके लिहिण्यासाठी त्यांनी आवश्यक परिभाषाही निर्माण केली. मुंबईच्या आय्.आय्.टी.मध्ये निळ्या डगल्यात, यंत्रशाळेत काम करणाऱ्या या माणसाने, मग केलेल्या धडपडीची ही कथा आहे. त्यात आय्.आय्.टी.मध्ये त्यांना मिळालेले उत्तेजन, पाश्चात्य यंत्रशास्त्रज्ञांनी केलेले सहकार्य यांचा उल्लेख आहेच तसेच आलेल्या अडचणी, अर्थसाहाय्याची उणीव यांचीही नोंद आहे. विशेष म्हणजे या सर्व घटनांच्या नोंदी श्री. भिडे पुरेशा अलिप्तपणे लिहितात. अखेरीला त्यांचा ज्ञानकोश श्री. रघुनाथ माशेलकर यांच्या अध्यक्षतेखाली मुंबईत २००४ साली प्रसिद्ध झाल्यामुळे त्यांना कृतकृत्य झाल्यासारखे वाटले. ही 'कथा' अशी शेवटी आनंददायी झाली. तिला दै. 'लोकसत्ता'चे संपादक श्री. कुमार केतकर यांची प्रस्तावना आहे. ■

12, प्रेसी बिल्डिंग, मळा, पणजी, 403001, गोवा.
दूरध्वनी : (0832) 2225816, 9881158225

## भाषाभिमान आणि भाषाविवेक

ग्रीसमधील 'युनिव्हर्सिटी ऑफ क्रीट' या विद्यापीठाने अलीकडेच (२५ ते २७ मे, २००७) एक चर्चासत्र आयोजित केले होते. या चर्चासत्राचे एक लक्षणीय वैशिष्ट्य म्हणजे त्याचे संपूर्ण संयोजन ग्रीक भाषेत झाले. उद्घाटन व स्वागताची सर्व भाषणे ग्रीकमधून झाली. या भाषणांचे इंग्लिश भाषांतर तात्काळ होत होते आणि ज्यांना ते ऐकायचे होते त्यांच्यासाठी फिलिप्सच्या श्राव्य उपकरणाची सोय होती. खुल्या (प्लीनरी) सत्रांमधील व्याख्यानांपैकी जवळजवळ पन्नास टक्के ग्रीक भाषेतूनच झाली. आणि त्यांचेही इंग्लिश भाषांतर तात्काळ होत होते. या खुल्या सत्रांखेरीज रोज तीन उपसत्रे समांतरपणे चालू होती. आणि त्यातली दोन इंग्लिशमध्ये तर एक पूर्णपणे ग्रीकमध्ये होते. संपूर्ण आयोजनात ग्रीकबद्दलचा स्वाभिमान होता आणि ग्रीक न येणाऱ्यांची सोयही होती !

मिलिंद मालशे

# पारितोषक विजेते नियतकालिक

विजया चौधरी

कर्मवीर रामरावजी आहेर कला, विज्ञान व वाणिज्य महाविद्यालय, देवळा (जि. नाशिक) या महाविद्यालयाचे एक वार्षिक नियतकालिक 'बांधिलकी' या नावाने निघते. या नियतकालिकाचा इ.स. २००५-२००६ या वर्षासाठीचा 'स्त्रीदर्शन' विशेषांक नुकताच पाहण्यात आला. महाविद्यालयीन विद्यार्थी-विद्यार्थिनींनी प्रा. एकनाथ पगार यांच्या संपादकत्वाखाली हा अंक काढला आहे. प्रा. एस्.बी. काळे सहसंपादक आहेत.

तब्बल ४६४ पानांच्या या अंकात १३८ लेख आहेत. या लेखांत स्त्री जागृती, स्त्रिया व कायदा, जाहिरातीतील स्त्री, दलित स्त्री, विधवांचे जीवन, हुंडा, निपुत्रिकत्व अशा विविध विषयांना स्थान तर दिले आहेच; पण दलित, आदिवासी व ऊसतोडणी करणाऱ्या कामगार स्त्रियांचेही आजचे प्रश्न हाताळले आहेत. लेख लिहिणाऱ्यांमधे विद्यार्थिनींचे प्रमाण ७०% पेक्षा जास्त आहे.

काही लेख हे कर्तृत्ववान स्त्रियांच्या कर्तृत्वावर लिहिलेले आहेत. उदा० महाराणी येसूबाई, सावित्रीबाई फुले, इंदिरा गांधी, संत जनाबाई, मुक्ताबाई, मदर टेरेसा इत्यादी.

या व्यतिरिक्त, स्त्री जीवनाचे दर्शन घडवणाऱ्या पुस्तकांवरही लेख लिहिलेले आहेत. यात स्त्रीवादी ललित साहित्यापासून ते चरित्र-संशोधनापर्यंतची सर्व पुस्तके येतात. काही पुस्तकांची नावे पाहिली तरी विषयांची विविधता लक्षात येईल. उदा० स्त्री-पुरुष तुलना (ताराबाई शिंदे), कागद आणि कॅनव्हास (अमृता प्रीतम) काबुली-वाल्याची बंगाली बायको (सुस्मिता बॅनर्जी), आय डेअर (किरण बेदी), डॉ. आनंदीबाई जोशी : काळ व कर्तृत्व (अंजली कीर्तने), ऐसपैस गप्पा : दुर्गाबाईंशी (प्रतिभा रानडे), आयदान (उर्मिला पवार), माझं कुवारपण (तस्लिमा नासरीन) इत्यादी.

स्त्री-जीवनाचा सर्वांगीण वेध घेताना, प्रादेशिक मराठीचा केलेला वापर सुखावून जातो. एक लेख हिंदीमधूनही आहे. याशिवाय, आहिराणी, कोकणा, भिल्ली या बोलींमध्येही काही लिखाण आहे.

अशा उपक्रमांमधून, विद्यार्थ्यांच्या सामाजिक जाणिवा विकसित होण्याबरोबरच, भाषिक संवर्धनही होत जाते हे महत्त्वाचे ! म्हणूनच विद्यार्थ्यांना लिहिते करणाऱ्या संपादकांचे अभिनंदन केले पाहिजे.

(टीप : मराठी अभ्यास परिषदेच्या महाविद्यालयीन वार्षिकांच्या स्पर्धेत 'बांधिलकी' या अंकाला प्रथम पारितोषक देण्यात आले.)

■

ई-503, गार्डनव्ह्यू, राधिका सोसायटी, पर्वती नगर,
सिंहगड रस्ता, पुणे 411 030.

---

## महाविद्यालयीन वार्षिकांक स्पर्धेचा निकाल

'मराठी अभ्यास परिषदे'च्या रौप्यमहोत्सवी वर्षपूर्तीनिमित्त आयोजित केलेल्या **महाविद्यालयीन वार्षिक अंक (२००६) स्पर्धेचा निकाल :**

**प्रथम पारितोषिक :** (रु. ५०००/-) 'बांधिलकी' - कर्मवीर रामरावजी आहेर कला, विज्ञान व वाणिज्य महाविद्यालय, देवळा, जि. नाशिक.

**द्वितीय पारितोषिक :** (रु. ३०००/-) 'परशुरामीय' - स.प.महाविद्यालय, पुणे.

**तृतीय पारितोषिक :** (रु. २०००/-) 'आकांक्षा' - न्या. तात्यासाहेब आठल्ये कला, वेद. शं.र.सप्रे वाणिज्य आणि विधिज्ञ दादासाहेब पित्रे संगणक विज्ञान महाविद्यालय, देवरुख, ता. संगमेश्वर, जि. रत्नागिरी.

**उत्कृष्ट कविता :** (रु. २००/-) 'प्रिय तुकाराम' - किरण लिमये, तृतीय वर्ष विज्ञान (रामनारायण रुइया महाविद्यालय, मुंबई - 'रुइयाइट'')

**उत्कृष्ट ललित लेखन :** (रु. २००/-) 'त्यांची नाही कुठे गणती !' क्रांती मिलिंद बोकील, तृतीय वर्ष वाणिज्य. (मराठवाडा मित्रमंडळाचे वाणिज्य महाविद्यालय, पुणे - ''ऊर्मी'')

या स्पर्धेसाठी प्रा. प्रसन्नकुमार अकलूजकर आणि श्रीमती विनया खडपेकर यांनी परीक्षक म्हणून काम पाहिले.

**नीलिमा गुंडी**
कार्यवाह, मराठी अभ्यास परिषद

---

# ‘विंदा दीडदा’

अशोक बालगुडे

तेवीस डिसेंबरची संध्याकाळ. पुण्यातील गोखलेनगर भागातील अक्षरनंदन शाळेच्या मैदानावर स्नेहसंमेलनासाठी जमलेल्या बाळगोपाळांमध्ये त्या दिवशी विंदा करंदीकर उपस्थित असते तर बहुधा त्यांना ‘ज्ञानपीठा’इतकाच आनंद झाला असता, कारण त्यांनी केलेल्या बालकवितांच्या आनंदात मुले दोन-अडीच तास अक्षरशः न्हाऊन निघाली होती. लहान मुलांसाठी कविता करताना विंदांनी जे अद्‌भुत विश्व निर्माण केले आहे, त्या विश्वाची सफरच घडवून आणणारा हा कार्यक्रम. त्यात काय नव्हते ? विंदांच्या बालकविता म्हटल्या जात होत्या; गायल्या जात होत्या. नृत्यातून फुलत होत्या; अभिनयातून साकारत होत्या; चित्र-विचित्र वेशभूषेतून धमाल करीत होत्या; निवेदनातून गुंफल्या जात होत्या; विद्यार्थ्यांच्या डोळ्यांतून ओसंडत होत्या ! एखाद्या कवीचा यापेक्षा मोठा सन्मान असू शकतो ? विंदांनी एकदा म्हटले होते, ‘कविता भोगावी !’ ‘विंदा दीडदा’ नावाच्या या संमेलनात नेमके हेच साध्य झाले.

इयत्ता पहिलीच्या मुलांनी ‘माकडाने काढले दुकान, आली गिऱ्हाईके छान छान’ ही कविता धीटपणे म्हटली, तर पाठोपाठ एका छोट्याने दिमडी वाढवून कोल्होबाच्या सर्कसची दवंडी दिली. मग सर्कशीतील एकेक कसरतीच सादर झाल्या. सशाच्या पाठीवर हत्ती उभा राहिला तेव्हाचा अभिनय लाजवाब. ‘सिंह करतो कडी आणि मुंगीच्या डोक्यावर उडी’ ही कविता साभिनय सादर झाली.

दीड दिवसाच्या गणपतीला निरोप देताना मुले खट्टू होतात. त्यांना आई समजावते :

> अगं त्याला । असतो अभ्यास, असते शाळा ।
> पुढच्या वर्षी । सुट्टी होईल ।
> तेव्हा आपल्या । घरी येईल ।
> अमृता म्हणाली ‘‘मग आत्ता,
> लाव खिशावर आपला पत्ता !’’

या कवितेने निर्माण केलेला हशा मग पुढे बराच वेळ कारंजासारखा पुन्हापुन्हा उसळत राहिला. 'पंढरपूरची शाळा' ही कविता अशीच धमाल उडविणारी.

पंढरपूरच्या वेशीपाशी । एक आहे छोटी शाळा,
सगळी मुले आहेत गोरी; । एक मुलगा कुट्ट काळा.
रोज करतो दंगामस्ती; । खोड्या करण्यात आहे अट्टल
मास्तर म्हणतात,
''करणार काय. न जाणो, असेल विठ्ठल !''

विनोदाप्रमाणे अद्‌भुताचेही मुलांना आकर्षण असते. पऱ्यांच्या कविता साभिनय सादर करताना सगळीच मुले हरखून गेली.

फुला फुला फूलना
वाऱ्यावरती झूल ना

हे गाणे म्हणताना वीस मुलांनी फुलांचा आकार बनविला होता. त्याला टाळ्यांच्या कडकडाटात दाद मिळाली.

या सगळ्याचा कळसाध्याय गाठला तो 'विंदा दीडदा' कार्यक्रमाने भीती आणि गूढाच्या प्रांतात प्रवेश केला तेव्हा. वेशभूषा व नेपथ्यासह सादर झालेल्या या कवितांनी सगळ्यांना एका वेगळ्याच विश्वात नेले.

आली, आली भूताबाई
तीन माणसे रोज खाई...
कीर्र रात्री, सुन्न रानी
झर्र वारा, भुर्र पानी
शार वाडा, गार भिंती
दार त्याचे हस्तिदंती.

या शब्दांना चालही तशीच समर्पक होती आणि पार्श्वसंगीताचाही अगदी योग्य वापर केलेला. भूत, पिशाच, कवटी या आणि अशा गोष्टी भीतीच्या कप्प्यातून अलगदपणे काढून गमतीचा विषय करण्याची विंदांची हातोटी विलक्षणच.

स्नेहसंमेलनाचा उपयोग आनंदाच्या निर्मितीबरोबरच शैक्षणिक उपक्रम म्हणूनही किती परिणामकारकपणे करता येतो, हे कल्पनाताई संचेती व 'अक्षरनंदन'च्या सर्व शिक्षक व विद्यार्थ्यांनी दाखवून दिले.

■

दै. लोकसत्ता, ६-१-२००७





अनुक्रमणिका

चर्चावृत्त

# विज्ञानांची मराठी : किती पुढे ? किती मागे ?

विजया चौधरी

मराठी अभ्यास परिषदेतर्फे दि. २५.२.०७ रोजी सायंकाळी ५.३० वाजता भांडारकर प्राच्यविद्या संशोधन मंदिराच्या टाटा सभागृहात 'विज्ञानाची मराठी - किती पुढे ? किती मागे ?' या विषयावर चर्चा आयोजित करण्यात आली होती. या चर्चेत डॉ. जयंत नारळीकर, डॉ. बाळ फोंडके, डॉ. पंडित विद्यासागर व श्री. अशोक पाध्ये असे विज्ञानलेखन-क्षेत्रातील नामवंत सहभागी झाले होते.

सर्वप्रथम, कार्यवाह डॉ. नीलिमा गुंडी यांनी आपल्या प्रास्ताविकात चर्चेच्या आयोजनामागची संस्थेची भूमिका स्पष्ट केली. विज्ञान-क्षेत्रातील ज्ञानाची निर्मिती, वितरण व प्रसार या संदर्भात मराठी भाषेचे नेमके स्थान जाणून घेण्याचा उद्देश यामागे आहे असे त्या म्हणाल्या.

त्यानंतर, निमंत्रित वक्त्यांची भाषणे झाली. त्याचा थोडक्यात गोषवारा याप्रमाणे-

**श्री. अशोक पाध्ये**

परदेशातील तंत्रज्ञान आपल्या भाषेत येते तेव्हा त्या त्या भाषेतील शब्दांचे आक्रमण आपल्या भाषेवर होत असते. पारिभाषिक शब्द तयार करताना न रुळणारे अवघड शब्द तयार केले जातात. त्यामुळे परिभाषेला क्लिष्टता येते. विषय नीट कळला तर कमीत कमी तांत्रिक शब्द वापरून लिहिता येते. ज्ञान महत्त्वाचे असते, शब्द नव्हेत. शिवाजी महाराजांच्या काळात डचांनी छापखाना चालवला होता. शिवाजीची तो विकत घेण्याची इच्छाही होती. पण मराठी भाषेतील अक्षरांचे खिळे नसल्यामुळे ती योजना बारगळली. तेव्हाच जर हे तंत्रज्ञान आपल्याकडे आले असते तर परिस्थिती बदलली असती.

**डॉ. पंडित विद्यासागर**

विज्ञान मराठीतून समजून घेण्याची वाढती इच्छा हा अलिकडील काळातला गुणात्मक बदल आहे. इंग्रजीतून शिकणारा सधन वर्ग मराठीपासून दूर गेला आहे. यासाठी केवळ मराठीची सक्ती करून भागणार नाही तर तिची उपयुक्तताही वाढवली पाहिजे. विज्ञानाची भाषा तयार करण्याचे दोन मार्ग असतात. एक तज्ज्ञांमार्फत व





अनुक्रमणिका

एक लोकवापरातून. लोकवापरातून तयार झालेली परिभाषा अधिक सहज व वापरण्या-योग्य असते. तज्ज्ञांच्या परिभाषेत कृत्रिमता अधिक असते. सरकारी पारिभाषिक शब्द अनेकदा समजायला अवघड जातात. हे शब्द सोपे करून वापरता आले पाहिजेत. पारिभाषिक शब्दांसंबंधीचे सरकारी नियम शिथिल केले गेले तर पाठ्यपुस्तकांतूनही सुलभ मराठी प्रतिशब्द आणता येतील. भाषेविषयी कुठलाही दुराग्रह न ठेवता विषय सहजरीत्या समजावा हे उद्दिष्ट ठेवले पाहिजे. इतर भाषकांनाही हा प्रश्न भेडसावत आहे. म्हणून याबाबतच्या त्यांच्या प्रयत्नांकडेही पाहिले पाहिजे. (पंडित विद्यासागर यांनी नववीच्या पाठ्यपुस्तक समितीचे निमंत्रक या नात्याने काही अनुभव सांगितले.)

**डॉ. बाळ फोंडके**

आधी भाषा की आधी विज्ञान ? या प्रश्नाचा विचार केला पाहिजे. भाषेचा व्यक्त होण्याचा प्रवास वस्तूला नाव देण्यापासून ते घटना, संकल्पना, नवनवीन शोध, अनुभवाचे विश्लेषण अशा टप्प्यांनी झालेला आहे. त्याचा विचार करता भाषा आणि विज्ञान यांचा परस्पर संबंध तपासून पाहिला पाहिजे. नवीन संशोधन इंग्रजीतूनच प्रसिद्ध होत असते. नवनवीन तंत्रज्ञानामुळे नवीन शब्द तयार होत आहेत. अशा शब्दांना योग्य मराठी शब्दांचा पर्याय दिला पाहिजे; जसा 'कॉम्प्युटर'ला 'संगणक'. 'हार्डवेअर'साठी 'यंत्रसामग्री' तसेच 'सॉफ्टवेअर'साठी 'मंत्रसामग्री' असा पर्याय देता येईल. विषय कळला असेल तर तो मराठीतूनच स्पष्ट करता येतो. डी.एन्.ए.वर मराठीतून लिहिताना 'रंगसूत्रा'पेक्षा 'गुणसूत्र' हा अधिक चांगला पर्याय मला सापडला. संशोधकांसाठी लिहिताना परिभाषेचा आग्रह अनाठायी आहे. परिभाषेचा प्रश्न हा जनसामान्यांसाठी लिहिताना येतो. जेव्हा वैज्ञानिक संशोधन मराठीतून केले जाईल तेव्हा मराठी ज्ञानभाषा होऊ शकेल. तोपर्यंत जेव्हा एखादी संकल्पना मराठीतून सांगता येत नाही तेव्हा मराठी शब्दाचा आग्रह न धरता इंग्रजी शब्द वापरायला हरकत नाही. पुष्कळदा, काही काही शब्दांचे व्यवहारातील अर्थ व विज्ञानातील अर्थ वेगवेगळे असतात. उदा० 'माऊस', 'कल्चर'. विज्ञानाचा अर्थ हा एकमेव व वस्तुनिष्ठ असतो आणि त्यामुळे विज्ञानाला गणिती भाषा अधिक प्रिय असते.

**डॉ. जयंत नारळीकर**

भाषा हे विज्ञानाच्या वितरणाचे, प्रसाराचे एक साधन आहे आणि विज्ञान जगभरात पसरवण्यासाठी इंग्रजी ही अत्यावश्यक भाषा आहे. अंतराळयाने जेव्हा अंतरिक्षात पाठवली गेली तेव्हा कुठलीच भाषा पुरी पडली नाही. इंग्रजीही कमी पडली. मनुष्य ज्या भाषेत विचार करतो तीच त्याची स्वाभाविक भाषा असते. इंग्रजीमधून शिक्षण दिल्याने मुलांना भाषेचे आकलन व संकल्पनांचे आकलन असा दुहेरी ताण

येतो. म्हणूनच विज्ञानाचे मूलभूत शिक्षण विद्यार्थ्यांच्या स्वाभाविक भाषेतून, म्हणजे मातृभाषेतून, दिले पाहिजे. सामान्य माणसालाही विज्ञान समजेल अशी भाषा त्यासाठी वापरली पाहिजे. तिच्यात सहजता हवी. इंग्रजी शब्द टाळण्याचा दुराग्रह नसावा. उलट, इतर भाषेतील शब्द पचवायची ताकद मराठीमधे यायला हवी. 'इंटरनेट', 'सॉफ्टवेअर' 'ई-मेल', 'ब्राऊझिंग' आदि ठिकाणी मराठीचा वापर वाढावा यासाठी तंत्रज्ञांनी प्रयत्न करायला हवेत. विज्ञान समजावून सांगताना भाषेचा अडथळा नसावा. तर इंग्रजीबरोबर को-रिलेशन किंवा सहजीवन असायला हवे.

अध्यक्ष प्रा. प्र. ना. परांजपे यांनी चर्चेचा समारोप केला. ज्ञान टिकेल अशी मराठी संवर्धित करण्याची गरज आहे असे ते म्हणाले. त्यासाठी त्यांनी योग्य वातावरण, विज्ञानलेखक व वाचक यांच्यातील सुसंवाद आणि समाजाला विज्ञानाभिमुख करण्याची निकड या गोष्टींची आवश्यकता आहे असे सांगितले.

शेवटी डॉ. नीलिमा गुंडी यांनी आभार मानले.

सभेच्या अखेरीस श्रोत्यांनी विचारलेल्या प्रश्नांना उत्तर देताना वक्त्यांनी दिलेली माहिती आणि व्यक्त केलेली मते :

आंतरराष्ट्रीय परिषदांमध्ये निबंध सादर करताना इंग्रजीचा अडथळा येत नाही, कारण अशा परिषदांमध्ये ज्ञानाकडे पाहिले जाते, भाषेकडे नाही, असे डॉ. नारळीकर म्हणाले. सामान्यांपर्यंत ज्ञान पोचविण्याच्या दृष्टीने आपले शैक्षणिक धोरण कधीच वापरले गेलेले नाही, असे मत व्यक्त करून विज्ञानाचा प्रसार व प्रचार होण्यासाठी मनुष्यबळाची आवश्यकता असल्यामुळे ज्याला विज्ञान समजते त्या प्रत्येकाने ते इतरांना सांगावे असे आवाहन त्यांनी केले.

डॉ. विद्यासागर यांनी मराठीत संकल्पना-कोश नसल्याची खंत व्यक्त केली. पण १०वी पर्यंतच्या अभ्यासक्रमात येणाऱ्या संकल्पनांचा कोश राज्य मराठी विकास संस्था आणि मराठी विज्ञान परिषद यांनी संयुक्तपणे प्रसिद्ध केला असल्याची माहिती डॉ. फोंडके यांनी दिली. ते म्हणाले, संशोधनाला भाषेची गरज नसते; ते इतरांपर्यंत पोचविण्यासाठी भाषा लागते. डॉ. विद्यासागर यांनी बालभारतीसाठी शालेय पाठ्यपुस्तके लिहिताना सरकारी समित्यांनी तयार केलेली परिभाषाच वापरण्याचा काच कसा होतो हे सांगितले. सोपे पारिभाषिक शब्द वापरले तर चौकशी समित्यांना तोंड द्यायची आपत्ती ओढवते असे ते म्हणाले. पाठ्यपुस्तकात मराठी संज्ञेचा इंग्रजी प्रतिशब्द लगेच कंसात देणे सरकारी नियमांना मान्य नाही. त्यामुळे परिभाषिक संज्ञांची सूची पुस्तकाच्या शेवटी देण्यावर समाधान मानावे लागते. ■

शंका...

# मराठी उच्चारण आणि देवनागरी लिपी

राजीव नाईक

मराठी उच्चारण आणि देवनागरी लेखनपद्धती ह्याबद्दलच्या काही शंका मांडत आहे.

'हृदय' ह्या शब्दाचा मूळ उच्चार 'हृदय' असा उ किंवा इ ह्या स्वरांखेरीजचा होता. मात्र अलीकडे कृष्ण, तृष्णा, पृच्छा इत्यादी अनेक शब्दांप्रमाणे, म्हणजे क्रुष्ण, त्रुष्णा, प्रुच्छा अशा काहीशा उच्चारांप्रमाणे, 'हृदय' ह्या शब्दाचा उच्चारही दैनंदिन बोलीमध्ये 'ऱ्हुदय' असा होतो. (मुद्दा ध्यानात घेण्यापुरतंच हे लेखन-उदाहरण स्वीकारावं, प्रत्यक्ष क्रमाकडे काहीसा काणाडोळा करावा.) आता भाषाशुद्धीच्या नादी लागण्याचा प्रश्न नाही, पण एक वेगळीच गमतीदार गोष्ट ह्या शब्दाबाबत घडत आहे. बहुतेक सर्व मराठी नाट्यगीतं/भावगीतांमध्ये हा शब्द 'हृदय' असा तर नाहीच पण 'ऱ्हुदय' असाही नव्हे; तर क्रिष्ण, त्रिष्णा, वगैरेच्या धरतीवर 'ऱ्हिदय' असा चक्क हिंदी वळणाचा केला जातो - अगदी उच्चारांसाठीही प्रसिद्ध असलेल्या मान्यवर गायक-गायिकांकडून, बहुतेक ज्या गीतांत शब्द येतो त्या सर्वच गीतांमध्ये उदा० ..कठिण ऱ्हिदय बाई', 'गुंतता ऱ्हिदय हे', 'ऱ्हिदयी वसंत फुलताना', इत्यादी. एरवी बोलताना तर हा उच्चार कानी पडत नाही. मग हे गायकच असा हिंदी वळणाचा उच्चार का करतात ? त्यामुळे नवोदित गायकही त्यांची री (किंवा ऱ्ही !) ओढतात. काय बरोबर काय चूक ?

इंग्रजी शब्द देवनागरीमध्ये लिहिण्याबाबतच्या काही शंका :

- उच्चार ऱ्हस्व असो वा दीर्घ, ई आणि ऊ अशी अक्षरंच वापरली जातात. उदा० बाईंडर, ई-मेल, साईन, वाईन, डाईन, किंवा माऊस, लाऊंज, हाऊ, इत्यादी. हे शब्द बाइंडर, इ-मेल, साइन, वाइन, डाइन, माउस, हाऊ असे लिहायला नकोत काय ? हे दीर्घत्वाचं प्रस्थ का माजलं आहे ?
- 'अँड किंवा 'ॲण्ड' ऐवजी 'ॲन्ड' असं का लिहिलं जातं ?
- 'केमिस्ट्स', 'नोट्स'ऐवजी 'केमिस्टस्', 'नोटस्' असं का लिहिलं जातं ? हवं असल्यास 'केमिस्ट्स्', 'नोट्स्' असं लिहावं, पण ह्याची गरज नाही, कारण नाहीतरी मराठीत शेवटच्या अक्षराचा उच्चार सहसा हलन्तच होतो. त्यामुळे

अधिकच्या लेखनाचा आणि दृश्य-गिचमिडीचा नसता त्रास कशाला ?

■ 'कॅप्टन', 'बिल्डिंग'पेक्षा 'केप्टन', 'बिल्‌डिंग' अशा लेखनामुळे मूळ उच्चार जास्त नेटकेपणाने सूचित होईल काय ? ■

35, कलानगर, वांद्रे (पूर्व), मुंबई 400051. दूरध्वनी 26590740

## लेखकांसाठी सूचना

लिखाण हस्तलिखित असो की टंकलिखित, ते कागदाच्या एकाच बाजूस सुवाच्य असावे. ओळींमध्ये व लिखाणाच्या चारही बाजूंना व्यवस्थित अंतर ठेवावे. लेखात इंग्रजी अवतरणे असल्यास त्यांचे मराठी भाषांतरही द्यावे. व्यक्तींची, ग्रंथांची नावे, लेखांची शीर्षके, पारिभाषिक संज्ञा इ० देवनागरी लिपीत लिहावे. अतिशय अपरिहार्य असेल अशाच ठिकाणी रोमन लिपीचा वापर करावा. लिखाणाच्या शीर्षकानंतर लेखकाने स्वत:चे नाव लिहावे. लिखाणाच्या शेवटी, थोडी जागा सोडून, पत्रव्यवहाराचा संपूर्ण पत्ता (पिनकोडसह) लिहावा. नावातील आद्याक्षरे मराठी लेखनपद्धतीप्रमाणे द्यावीत. ('ए.आर.' नको; 'अ.रा.' हवे.) लिखाणाची भाषा शक्यतो सोपी व नेमकी असावी. पुनरुक्ती, अनावश्यक शब्दयोजना, क्लिष्ट वाक्यरचना टाळावी. लिखाणासोबत स्वतंत्र कागदावर स्वत:चा परिचय (शिक्षण, व्यवसाय, प्रकाशित लेखन इ०) थोडक्यात द्यावा. दूरध्वनी क्रमांक (संकेतक्रमांकासह) द्यावा.

## संदर्भ कसे द्यावेत ?

संदर्भ देण्याची नवी, सोयीस्कर व जागेचा अपव्यय टाळणारी पद्धत पुढे दिली आहे. या पद्धतीचाच लेखकांनी आपल्या लेखात उपयोग करावा : लेखात ज्या ठिकाणी संदर्भ द्यावयाचा असेल तेथे कंसामध्ये संबंधित पुस्तक-लेखकाचे नाव द्यावे आणि त्यापुढे संदर्भित पुस्तक/लेखाचे प्रकाशनवर्ष द्यावे. त्यानंतर, आवश्यक असल्यास, स्वल्पविराम देऊन पृष्ठक्रमांक लिहावा व कंस पुरा करावा. लिखाणाच्या अखेरीस 'संदर्भसूची'मध्ये संदर्भातील सर्व तपशील द्यावेत.सूचीतील प्रत्येक नोंदीतील तपशिलांचा क्रम साधारणपणे असा ठेवावा : लेखकाचे आडनाव, स्वल्पविराम, नावांची आद्याक्षरे, प्रकाशनवर्ष, ग्रंथाचे शीर्षक, पूर्णविराम, प्रकाशनसंस्था, स्वल्पविराम, प्रकाशनस्थळ, पूर्णविराम. संदर्भसूची मराठीच्या वर्णक्रमानुसार असावी.

# डावीकडे-उजवीकडे आणि राजसूय

मा. ना. आचार्य

**(१) अंकानां वामतो गतिः ।**

श्री. प्रशांत परदेशी यांच्या 'मागचं-पुढचं' या टिपणातील (वर्ष २५, अंक २) 'मागे-पुढे', डावीकडे-उजवीकडे' या संबंधीचे संदर्भबिंदूचे विवेचन वाचीत असताना संस्कृतमधील 'अंकानां वामतो गतिः।' या संख्यावाचनाच्या नियमाची आठवण झाली.

शाळेत संस्कृत शिकताना त्यावेळच्या (इ.स. १९४६-४७) क्रमिक पुस्तकात शंभराच्या पुढील संख्यावाचके 'अधिक वा उत्तर' असा शब्द घालून कशी लिहितात, हे सांगताना दिलेली उदाहरणे व केलेले विवेचन सारांशरूपाने असे होते -

- पाच हजार सातशे बासष्ट विहिरी → द्विषष्ट्यधिकसप्तशतोत्तर पंचसहस्रं वाप्यः।
- इ.स. १८७४ साली → चतुःसप्तत्यधिकाष्टशतोत्तरैकसहस्रतमे क्रिस्ताब्दे।
- जुने शिलालेख, पोथ्या इत्यादींमध्ये शक वा सन यांचे आकडे सांकेतिक पद्धतीनेही लिहीत. त्यासाठी १, २, ३, ४... इ. संख्यांसाठी प्रसिद्ध असलेले पदार्थच योजीत. उदा० ० = ख, आकाश, पृथ्वी, भू = १, नेत्र, भुज = २, भुवन, अग्नी = ३, समुद्र, वेद, युग = ४, असू, प्राण = ५, रस, रिपू = ६, मुनी, अश्व = ७, वसू = ८, ग्रह = ९ इत्यादी.

उदा० लो. टिळकांनी गीतारहस्याचे लेखनवर्ष पुढीलप्रमाणे दिले आहे → शाके मुन्यग्निवसुभूसंमिते शालिवाहने । = शके १८३७.

अशा काही उदाहरणांचा खुलासा करणारी टीप अशी होती -

''वरील उदाहरणांवरून हे ध्यानात येईल की, एकं किंवा दशंस्थानच्या संख्येस अधिक शब्द जोडून जरुरीप्रमाणे डावीकडून उजवीकडे शत, सहस्र, लक्ष इत्यादी स्थानच्या संख्या समासात योजत जायच्या असतात. (अंकांना वामतो गतिः।)

[डॉ. के.ना. वाटवे - 'संस्कृत सुबोधिनी' भाग ३ (१९४३) पृ. १८५-१८६]

आता उक्त नियमातील 'वामत:' शब्दात 'तस्' हा पंचमीबोधक प्रत्यय आहे. म्हणून वामत: = डावीकडून असा अर्थ उपरोक्त टिपेत गृहीत धरलेला दिसतो. परंतु हा अर्थ घोटाळा निर्माण करणारा आहे. कारण आपण अक्षरे/शब्द नेहमी डावीकडून उजवीकडेच लिहीत जातो. मग संख्या उजवीकडून डावीकडे लिहिलेल्या दाखविताना 'डावीकडून उजवीकडे' असे का म्हटले आहे ?

खरे म्हणजे येथे 'वाम' = उलट, विरुद्ध असा अर्थ आहे. डॉ. वाटव्यांनी हा खुलासा का बरे केला नाही ?

[वाम = डावा, उलट, सुंदर. प्रतीप = उलट, शाकुं. ४.१८ या श्लोकात प्रतीप व वाम हे विरुद्ध या अर्थाचे दोन्ही शब्द एकत्र मिळतात.

अर्थात वाम = डावा काय वा विरुद्ध काय दोन्ही सापेक्षच.

येथेच प्रा. कृ. श्री. अर्जुनवाडकर यांनी 'अंकानां...' या नियमाचा केलेला खुलासा मुद्दाम उद्धृत करतो. मुंबई विद्यापीठाने प्रकाशित केलेल्या प्रा. मंगरूळकर-केळकर संपादित 'ज्ञानदेवी'मध्ये प्रा. अर्जुनवाडकरांनी काही ओव्यांवर उद्बोधक टिपा लिहिल्या आहेत. त्यातील एक अशी - ज्ञानदेवी अ.१० मध्ये मूळ गीतेनुसार भगवंताच्या ठळक अशा ७५ विभूतींचा उल्लेख आहे. त्यांचा यथामूल उल्लेख केल्यानंतर ज्ञानदेव म्हणतात,

'ऐसिया पांचसात प्रधाना । विभूती सांघितलिया अर्जुना ।
ती उद्देशु गा मना । आहाचु गमला ॥ (१०.२७८०)'

यावरील टिपेत प्रा. अर्जुनवाडकर लिहितात, ''ह्या ठिकाणी 'अंकांनां वामतो गति:' (आकड्यांची दिशा डावीकडे - म्हणजे अक्षरांची दिशा डावीकडून उजवीकडे असते त्याच्या उलट दिशेने असते.) ह्या गणित ग्रंथात प्रसिद्ध असलेल्या रूढीने ५ आणि ७ हे आकडे मांडले असता ७५ ही संख्या मिळते...'' (पृ. ६३६)

**(२) राजसूय नव्हे, अश्वमेध !**

याच अंकात डॉ. सुमन बेलवलकर यांनी केलेले 'शब्दानुबंध'चे परीक्षण आहे. त्यामध्ये त्या शेवटी म्हणतात, 'राजसूय यज्ञ करणाऱ्या साहित्यिक युधिष्ठिरांनी थोडे लक्ष देऊन पाहिले तर या अभिनिवेशरहित लेखनातला नकुल आधीच अर्धा सुवर्णाचा आहे, हे त्यांच्या लक्षात येईल. (पृ. ५९)... येथील नजरचूक अशी की महाभारतामध्ये नकुलकथा येते ती युधिष्ठिराने केलेल्या अश्वमेधाच्या वेळी. राजसूयज्ञाच्या वेळी नव्हे. (आश्वमेधिक पर्व - अ. ९२-९३ भांडारकर प्रत).

■

मु. व पोस्ट चौल, ता. अलिबाग, जि. रायगड 402203.

# दुरुस्तीची दुरुस्ती

म. अ. मेहेंदळे

'भाषा आणि जीवन'च्या (२४:३/पावसाळा २००६) अंकात डॉ. अ.रा. केळकर यांचा कार्यशैलीविषयी लेख प्रसिद्ध झाला. त्यात त्यांनी डॉ. कत्रे डेक्कन कॉलेज संस्थेचे पहिले संचालक (१९४२-१९७१) असल्याचे म्हटले होते. डॉ. केळकरांच्या वरील विधानातील एक चूक डॉ. शोभना गोखले यांनी 'भाषा आणि जीवन'च्या (२४:४ दिवाळी २००६) अंकात दुरुस्त करताना डेक्कन कॉलेजचे पहिले संचालक डॉ.कत्रे नसून प्रा.आय्.जे.एफ. तारापोरवाला होते आणि त्यांचा त्या पदाचा कालावधी १९३९ ते १९४२ असा होता, असे म्हटले आहे.

डॉ. गोखले यांच्या या विधानालाही दुरुस्तीची आवश्यकता आहे. डॉ. तारापोरवाला पहिले संचालक होते हे खरे, पण त्यांचा कालावधी १९४०-४२ असा सुमारे दोन वर्षांचा होता. डेक्कन कॉलेजचे पुनरुज्जीवन १९३९ ऑगस्टमधे झाले. पहिले एक वर्ष (१९३९-४०) संस्थेला कोणी संचालक नव्हता. पहिल्या तीन प्रोफेसरांपैकी डॉ. व्ही.एम. आपटे, डॉ. एस.एम.कत्रे, आणि डॉ. एच.डी. सांकलिया यांच्यापैकी कोणाची तरी संचालकपदी नियुक्ती अपेक्षित होती; पण ती झाली नाही. त्याऐवजी संचालकाचे काम करण्यासाठी एक कमिटी ऑफ डिरेक्शन नेमण्यात आली. त्या कमिटीचे सभासद म.म. डॉ.द.वा.पोतदार, प्रि.आर.डी. करमरकर, डॉ. व्ही.एस. सुखटणकर आणि डॉ.धनंजयराव गाडगीळ हे पुण्यातील चार संशोधन आणि शिक्षणसंस्थांचे तत्कालीन प्रमुख होते. (कमिटीचे चेअरमन कोण होते आठवत नाही. डॉ.पोतदार असावेत असे वाटते.) १९४०च्या जानेवारीच्या सुमारास संचालकपदासाठी पुन्हा जाहिरात देण्यात आली आणि आलेल्या अर्जदारांपैकी डॉ. तारापोरवाला यांची निवड झाली. १९४०च्या जूनच्या आसपास डॉ. तारापोरवाला आपल्या पदावर रुजू झाले. डॉ. तारापोरवालांच्या नावाची आद्याक्षरे आय. जे.एफ. नसून आय.जे.एस. अशी आहेत.

वरील हकीकतीची नोंद घेणेही आवश्यक आहे. ■

# पुन्हा एकदा 'गांधीगिरी' !

म. अ. मेहेंदळे

'गांधीगिरी' हा एक अनिष्ट शब्दप्रयोग आहे आणि मराठी भाषेत त्याचा उपयोग चालू राहाणे इष्ट नाही या विषयीचे माझे पत्र दैनिक 'सकाळ'मधे (३१.१०.०६) प्रसिद्ध झाले होते. आपण ते पत्र 'भाषा आणि जीवन'च्या अंकात (२५.१, हिवाळा २००६, पृ. ४३) प्रसिद्ध करून त्याची दखल घेतलीत याबद्दल मी आपला आभारी आहे. या अनिष्ट शब्दाविषयी पुन्हा एकदा लिहिण्यास निमित्त घडले ते असे की काही दिवसांपूर्वी आचार्य अत्र्यांच्या काही निवडक लेखांचा संग्रह असलेले एक पुस्तक ('निवडक अत्रे' कॉंटिनेंटल प्रकाशन, ४थी आवृत्ती, १९९७) माझ्या वाचनात आले. त्यात अत्र्यांनी म.म. दत्तो वामन पोतदार यांच्यावर लिहिलेला 'पुण्याचा एक तेजस्वी ब्राह्मण : प्रा. दत्तो वामन पोतदार' हा लेख आहे. प्रा. ना.सी. फडके यांच्या कोणत्यातरी कामगिरीचा समाचार पोतदारांनी घेतल्याची माहिती देताना अत्र्यांनी 'फडकेगिरीचा धुव्वा उडाला' असे म्हटले आहे. त्यावरून 'गिरी' या प्रत्ययाचा उपयोग मराठीत हेटाळणी, उपहास व्यक्त करण्यासाठी होतो हे स्पष्ट होते. पोतदारांनी त्यासाठी जे केले त्याच्याविषयी अत्रे 'पोतदारगिरी' असे म्हणत नाहीत, 'दत्तोपंती' (वक्तृत्व) असे म्हणतात हे लक्षात घ्यायला हवे. एखाद्या व्यक्तीच्या नावाला त्याच्याविषयी हेटाळणी, टिंगल व्यक्त करण्यासाठी 'गिरी' हा प्रत्यय जोडलेला 'फडकेगिरी' हा मराठीतला पहिलाच प्रयोग असावा. आणि आता हा दुसरा गांधीगिरी. पहिल्या शब्दाने अपेक्षित अर्थ व्यक्त होतो. दुसऱ्याने होत नाही, म्हणूद दुसरा अनिष्ट आहे. एखादा गांधीद्वेष्टा गांधी विचारांविषयी तिरस्कार व्यक्त करण्यासाठी 'गांधीगिरी' हा शब्द वापरील, गांधी विचारांचे अनुकरण करणारा तसे करणार नाही. 'लगे रहो मुन्नाभाई' हा सिनेमा मी पाहिला नाही. पण असे ऐकतो की त्या सिनेमात ज्याने हा शब्दप्रयोग केला आहे. त्याचा हेतू चांगला आहे, पण शब्दप्रयोग चुकीचा आहे. त्याने केलेली चूक आपण परत परत करावी असे नाही. ती शक्यतो लवकर दुरुस्त करायला हवी. मराठीतली 'खोर' (जसे दिवाळखोर), 'बाज' (जसे दारूबाज) या प्रत्ययांसारखीच

'गिरी' हा प्रत्यय आहे. 'गांधीगिरी' शब्दप्रयोगाचे उच्चाटन व्हावे यासाठी प्रसारमाध्यमांचा मोठा हातभार लागणार आहे. त्यांनी त्यांच्या वर्तमानपत्रांत त्या शब्दाला थारा न देणे इष्ट आहे. त्यासाठी मराठी साहित्य परिषद, मराठी अभ्यास परिषद यांसारख्या संस्थांनी त्या शब्दाविषयी आपली नापसंती व्यक्त करावी अशी अपेक्षा आहे.

■

बी-4, प्रबोधन हौसिंग सोसायटी, 61/9-10, एरंडवणे, पुणे 411 004.
दूरध्वनी 25430411

---

# चुकीची दुरुस्ती

**माणिक धनपलवार**

वर्ष २५ : अंक २, उन्हाळा २००७ मधील माझ्या लेखातील पुढील चुका/मुद्रणदोष कृपया सुधारून घ्याव्यात :

| | चूक | बरोबर |
|---|---|---|
| पृ. ३० खालून ओळ ३ | नक्करी | नक्करू |
| पृ. ३१ ओळ १ | मावळन | मावुलनु |
| पृ. ३१ ओळ १ | साळवन | सालवनु |
| पृ. ३१ ओळ १८ | मुडसास | मुडसारु |

काही चुका माझ्या लेखनामुळे झाल्या आहेत तर काही मुद्रणदोष आहेत.

■





अनुक्रमणिका

प्रतिसाद ४

# भाषेतील उदारमतवाद आणि मुद्रण

दिवाकर मोहनी

**संदर्भ :** २४:४ दिवाळी २००६मधील संपादकीय.

'शुद्धलेखन' ह्या शब्दामध्यें शुद्ध हें जें पूर्वपद आहे त्याला सध्यां उच्चवर्णीयत्वाचा उग्र गंध वा दर्प येतो हें मान्य आहे. त्यामुळें शुद्धलेखनाच्या नियमांना 'मराठीचे लेखनविषयक नियम' म्हणणें तूर्त जास्त उचित होईल. (शुद्धलेखन-नियमांमध्यें केलेले फरक आणि लिपिसुधारणा ह्यांमध्यें तत्त्वत: काहींहि फरक नाहीं. कारण हे सारे संकेत दृष्टिगम्य आहेत. डोळ्यांना दिसणारे आहेत.)

ज्यावेळीं जुनें शुद्धलेखन रूढ होतें, त्यावेळींहि पूर्णतया शुद्ध लिहिणारे संख्येनें फार थोडे होते. सगळ्या लेखकांना शुद्धलेखनाचे नियम काटेकोरपणें पाळतां येत होते असें मुळींच नाहीं. सगळ्या सुशिक्षितांचीं आपसांतील पत्रें आणि इतर खासगी लेखन रूढ शुद्धलेखनाचा अवलंब न करतांहि होत होतें, फक्त प्रकाशकांसोबत काम करणारे संपादक आणि मुद्रितशोधक लेखन-नियमांत तरबेज होते. १९३० पूर्वी एकमेकांना पत्रें लिहिण्यासाठी मोडी लिपीचा वापर होत होता आणि मोडीमध्यें अनुच्चारित काय उच्चारित अनुस्वारसुद्धां लिहिले जात नव्हते; ऱ्हस्व-दीर्घाचा पत्ता नव्हता. म्हणजे लेखनाची लिपि वेगळी होती आणि वाचनाची, छापलेल्या पुस्तकांची वेगळी होती : लेखनासाठीं मोडी आणि वाचनासाठीं 'बाळबोध'. आपण जसें बोलतों किंवा आपण जसें आपसांत लिहितों तसेंच वाचावयास मिळावें अशी कोणत्याहि सुशिक्षित वाचकाची अपेक्षा नव्हती. छापील मजकुरांतून आपले उच्चार आपल्यास वाचावयास मिळावे अशी कोणाचीहि अपेक्षा नव्हती. ही अपेक्षा अंदाजें 1930 नंतर निर्माण झाली असावी. कारण त्यानंतर मोडीलेखनाचा प्रघात कमी होत चालला आणि लेखनाची जागा मोडीऐवजी नागरी लिपीनें घेतली.

लेखनाचे नियम सुलभ असावेत ही मागणी मला अगदी चुकीची वाटते त्याचीं मुख्य कारणें दोन. (१) जीं माणसें लिहिणार त्यांचें सगळ्यांचें लेखन पुस्तकांमध्यें छापण्यासाठीं अथवा नियतकालिकांसाठीं नसणार. तें वाचणाऱ्यांची संख्या अत्यल्प

असणार. त्यामुळें त्यांनीं एकमेकांना समजण्यापुरतें लिहिलें तरी कोणालाहि त्याची अडचण वाटणार नाहीं. मोडीचें लेखन जसें एकमेकांसाठीं किंवा स्वत:साठीं होतें तसेंच हेंहि. छापलेला मजकूर निरनिराळ्या काळांत आणि प्रदेशांत जाणार म्हणून तेथें लेखनाचे नियम पाळावे लागतात. अन्यथा ते पाळण्याची गरज नाहीं. (२) लेखनाचे नियम सोपे करावे ते कोणासाठीं ? ज्यांची बुद्धि कमी आहे त्यांच्यासाठीं. ते सोपे करावे असें म्हटल्याबरोबर आपल्या सगळ्या पुढच्या पिढ्यांचीं मुलें कमी बुद्धीचीं आहेत असा त्यांच्यावर आरोप केल्यासारखें होतें. असा आरोप आपण करावा अथवा असें गृहीतक स्वीकारून आपले नियम करावे हें मला मुळींच योग्य वाटत नाहीं. शुद्धलेखनाचा विषय ही अभिनिवेशाची बाबच नव्हे. छापलेला मजकूर वाचायला सोपा व्हावा आणि तो कोणत्याहि काळांत व प्रदेशांत सुलभपणें वाचला जावा; त्यांत एकसारखेपणाा असावा; आपापल्या उच्चाराप्रमाणें त्यांत फरक पडूं नये, अनेक उच्चारांचे प्रतिनिधित्व करणारे शब्द तेथें असावे; उच्चाराला अथवा लेखनाला उच्चनीचतेचा उपसर्ग न व्हावा अशा हेतूनें केलेले असावेत. 'तो' हें तृतीय पुरुषी, पुंलिङ्गी, एकवचनी सर्वनाम आहे. त्याचा उच्चार स्थानपरत्वें त्यो, थो, थ्यो, असा होतो. प्रमाणभाषेंत 'तो' हा विभिन्न उच्चारांचें प्रतिनिधित्व करणारा एक शब्द आपण स्वीकारलेला आहे.

आपली भाषा संस्कृतोद्भव आहे असें समजणें चूकच आहे. कोणतीहि भारतीय भाषा संस्कृतोद्भव नाहीं, ती संस्कृत-शब्द-प्रचुर आहे. संस्कृत भाषेंतून आलेले तत्सम शब्द यथामूल लिहिल्यानें त्यांचा अर्थ कळणें सोपें होतें. तसेंच शब्दकोशांत त्यांचा अर्थ पाहतां येतो. आपापल्या उच्चाराप्रमाणें तो शब्द लिहिला गेल्यास तो शब्द चुकीचा अर्थ दाखवूं शकतो. आणि त्यांतील सातत्य नष्ट होतें. संस्कृत भाषेतूनच नव्हे तर कोणत्याहि भाषेंत मुळांतच संस्कृतमधून किंवा आणखी कोणत्याहि भाषेंतून घेतलेले शब्द आपल्या उच्चारांप्रमाणें बदलून घेणें योग्य नाहीं.

कोणत्याहि शब्दाला एकाच संदर्भात पुन्हांपुन्हां वापरल्यामुळेंच अर्थ येतो. म्हणजेच तो अर्थ सातत्यानें येतो. हें सातत्य नष्ट केल्यामुळें वाचनवेग मंदावतो. ही जशी आमची एक तक्रार आहे तशीं अन्य भाषकांना नवीजुनीं मराठी पुस्तकें वाचतांना अनेक अडचणी उद्‌भवणार आहेत ही दुसरी तक्रार. भाषेचें लेखन नवीन, गंभीर विषय समजावून देण्यासाठीं जेव्हां होत असतें तेव्हां वाचकाला कोठलेहि पूर्वसंदर्भ माहीत नसतात. म्हणून असे विषय समजावून देतांना शास्त्रपूत व्याकरणशुद्ध भाषाच वापरावी लागते. माझ्या डोळ्यांपुढें आतां उदाहरण येतें तें संस्कृत, लॅटिन, फार्शी, ग्रीक, चीनी, जपानी, जर्मन, फ्रेंच, इत्यादि भाषांचें. त्यांतील मौलिक आणि अभिजात साहित्य मुळांतून वाचण्यासाठीं किंवा समजून घेण्यासाठीं लोक त्या शिकतात. त्या

अभिजात भाषानीं उदारमतवाद स्वीकारला तर आम्हां अन्य भाषकांसाठीं त्या अगम्य होतील. मराठीनें तो स्वीकारला तर तें लेखन अन्य भाषकांसाठीं अगम्य होईल.

भाषाव्यवहारामध्यें उदारमतवाद आणून भाषेची बांधणी शिथिल किंवा विसविशीत होईल. पूर्वसंदर्भ वाचकाला माहीत नसताना आपल्या लेखनामधून ते निर्माण करून गुंतागुंतीचे भिन्नभिन्न विषय अल्पाक्षरांत मांडण्याचें आव्हान मराठीला स्वीकारावयाचें आहे. हें लक्षांत असूं द्यावें.

परभाषकाला आपली भाषा शिकतांना आणि तीमधील जुनीं-नवीं पुस्तकें वाचतांना कुठलीहि अडचण येऊं नये, ह्यासाठीं भाषालेखनाचे नियम बदलूं नयेत हें गरजेचें आहे. पुस्तकें वाचतांना त्यांचा वाचक एकेक अक्षर वाचणार नसतो. तो अधलेमधले शब्द वाचणार असतो. वाचकाची नजर जेथें स्थिरावेल त्या शब्दानें जास्तींत जास्त निःसंदिग्ध अर्थ दिल्यास म्हणजे डोळ्यांना दाखविल्यास वाचकाचे कार्य सोपें होतें. त्याला कमी शब्द वाचून पूर्ण अर्थबोध होतो.

आपण 'ष'चा उच्चार बहुसंख्य मराठी भाषकांच्या बोलण्यात ऐकूं येत नाहीं असें म्हटलें आहे. म्हणून भाषा, विषय या शब्दांतील 'ष' लिहिणें सोडून 'भाशा' 'विशय' असें लिहावे का ? असें लिहिल्यास तें आमच्यासारख्यांच्या डोळ्यांना खुपतें. कोशामध्यें हा शब्द कधींच सापडणार नाही ही दुसरी अडचण. डोळ्यांना दिसणारी आकृति पूर्ववत् ठेवून तिचा उच्चार वाचकानें कसाहि करावा. नाहींतरी प्रत्येकाचा उच्चार आपल्या मुखाच्या रचनेप्रमाणें होत असतो असें आम्हांला वाटतें.

माझा आग्रह आपसांतील सर्व भाषाव्यवहार हा पूर्णपणे शुद्ध असला पाहिजे असा नाहीं. तेथला उदारमतवाद मला मान्य आहे. नवीन संशोधकांचे प्रबन्ध त्यांचे परीक्षक तें संशोधन कृतक आहे हें जाणून किंवा हें माहीत असलें तरी त्याकडे दुर्लक्ष करतात. त्याचप्रमाणें अशा प्रबंधांचें शुद्धलेखनहि त्यांनीं दुर्लक्षित केल्यास मला चालेल. त्या प्रबंधांचें मुद्रण करतांना मात्र त्याचें 'शुद्धलेखन' सुधारून घेणें आवश्यक आहे इतकेच मला सांगायचें आहे. मला पडणारा प्रश्न असा कीं उदारमतवाद म्हणून अनसूयेला नेहमींसाठीं अनुसया करणें आणि अधीक्षकाला अधिक्षक करणें योग्य होईल काय ? आपण तसा उच्चार करतों हें मान्य आहे. पण प्रत्येक शब्दाचें तसें केल्यास त्या शब्दाचा मूळ अर्थ बदलतो किंवा नव्या शब्दाला अर्थच राहात नाहीं. उच्चाराप्रमाणें लेखन प्रमाण मानलें तर एकाच धातूपासून उपसर्ग आणि प्रत्यय लागून निरनिराळे शब्द बनतात हें जसें वाचकांच्या लक्षांत येत नाहीं तसेंच लेखकानें साकूत (साभिप्राय) विशेषणें वापरून भाषेमध्यें निर्माण केलेलें लालित्य आणि सौंदर्य वाचकांना अनुभवता येत नाहीं. शब्दांना, नामांना असलेला अर्थ टिकवून धरणें आम्हां मुद्रकांचें काम

आहे. तें, आपल्या उदारमतवादामुळें, करणें आम्हांला शक्य होत नाहीं. तरी आपला उदारमतवाद मुद्रणाच्या बाबतींत आम्हांला मान्य होऊं शकत नाही. ग्रान्थिक भाषेंत आम्हांला ऱ्हस्वदृष्टीनें केलेले कोणतेहि बदल नकोत. ■

मोहनीभवन, धरमपेठ, नागपूर 440 010.
दूरध्वनी 2558128

---

प्रतिसाद-५

## परार्ध व अक्षौहिणी

मनोहर राईलकर

भाषा आणि जीवन अंक २४ : १, पृ. ५६वरील शंकेबाबत :

(१) परार्ध ही १८ अंकी संख्या आहे. १ वर १८ शून्ये नव्हेत; १ वर १७ शून्ये. सामान्यत: कोटि - दशकोटिपर्यंतच्या संख्यांची नावे परिचित असतात. अलीकडे १०० कोटि = १ अब्जही प्रचारात आहे. त्यापुढील संख्या -

| | | | | |
|---|---|---|---|---|
| १ अब्ज | = | १ वर ९ शून्ये | = | $१०^{९}$ |
| १ खर्व | = | १ वर १० शून्ये | = | $१०^{१०}$ |
| १ निखर्व | = | १ वर ११ शून्ये | = | $१०^{११}$ |
| १ महापद्म | = | १ वर १२ शून्ये | = | $१०^{१२}$ |
| १ शंकु | = | १ वर १३ शून्ये | = | $१०^{१३}$ |
| १ जलधि | = | १ वर १४ शून्ये | = | $१०^{१४}$ |
| १ अन्त्य | = | १ वर १५ शून्ये | = | $१०^{१५}$ |
| १ मध्य | = | १ वर १६ शून्य | = | $१०^{१६}$ |
| १ परार्ध | = | १ वर १७ शून्य | = | $१०^{१७}$ |

अलीकडे इतकी शून्ये वापरून संख्या लिहीत नाहीत. शेवटच्या स्तंभाप्रमाणे लिहितात.

(३) अक्षौहिणी हे संख्यावाचक विशेषण म्हणून आपटे/ओक कोशात नाही. तर विशिष्ट प्रकारचा सेनासमूह होय. २१,८७० रथ + २१८७० हत्ती + ६५,६१० (तिप्पट) घोडे, १,०९,३५० (पाचपट) पायदळ. ■

राईलकर हॉस्पिटल, कदमवस्ती, पो. लोणी काळभोर, जि. पुणे 411201.
दूरध्वनी 32906387

# पारितोषिक-वितरण आणि पुस्तक-प्रकाशन

**रंजना फडके**

मराठी अभ्यास परिषदेच्या रौप्यमहोत्सवी वर्षानिमित्त घेण्यात आलेल्या महाविद्यालयीन वार्षिक अंक (२००६) स्पर्धेचा पारितोषिक वितरण समारंभ आणि ज्येष्ठ भाषातज्ज्ञ डॉ. अशोक रा. केळकर यांच्या 'वैखरी' या पुस्तकाच्या द्वितीय आवृत्तीचे प्रकाशन असा संयुक्त कार्यक्रम एक मे २००७ रोजी निवारा सभागृहात भाषेबद्दल आत्मीयता असणाऱ्या जाणकार रसिकांच्या उपस्थितीत साजरा करण्यात आला.

या कार्यक्रमाच्या अध्यक्षस्थानी प्रा. प्र.ना. परांजपे होते. प्रमुख पाहुणे श्री. सदा डुंबरे (संपादक, साप्ताहिक सकाळ) यांच्या हस्ते पारितोषिक वितरण व 'वैखरी' या पुस्तकाच्या दुसऱ्या आवृत्तीचे प्रकाशन करण्यात आले.

कार्यक्रमाचे प्रास्ताविक करताना कार्यवाह डॉ. नीलिमा गुंडी यांनी संस्थेच्या उद्दिष्टांचा परिचय करून दिला. भाषा टिकवायची असेल तर भाषेवर प्रेम करावे लागते. तरुण पिढीला त्याचे महत्त्व पटवून द्यावे लागते. महाविद्यालयीन वार्षिकांच्या स्पर्धेमुळे तरुणांमध्ये भाषेविषयीची जागरूकता निर्माण होण्यास साहाय्य होईल, या विश्वासाने परिषदेने ही स्पर्धा घेतली असे त्यांनी सांगितले.

या स्पर्धेसाठी परीक्षणाचे चिकाटीचे व अवघड काम प्रा. प्रसन्नकुमार अकलूजकर व विनया खडपेकर यांनी केले. प्रा. अकलूजकर म्हणाले की, वार्षिक म्हणजे केवळ नुसते अहवाल, छायाचित्रे असू नयेत. त्यांतून तरुण मनाच्या स्पंदनांबरोबरच आपल्या अस्तित्वाच्या सामाजिकतेचे भानही व्यक्त व्हायला हवे. समकालीन विद्यार्थीजीवनाचे प्रतिबिंब दाखवणारी नियतकालिके म्हणजे सांस्कृतिक दस्तऐवज असतात. वार्षिकांमधील लेखनातून (विशेषतः ग्रामीण भागातील) आश्वासक चित्र समोर येत आहे, असे त्यांनी सांगितले.

पारितोषिक विजेत्यांना प्रमुख पाहुणे श्री. सदा डुम्बरे यांचे हस्ते पुरस्कार देण्यात आले. आपल्या वार्षिकांच्या निर्मितीबाबत श्री. एकनाथ पगार, प्रा. अरुण बेलसरे, प्रा. अरुण कुलकर्णी यांनी आपली मनोगते व्यक्त केली. क्रांती बोकील (मराठवाडा

मित्रमंडळाचे वाणिज्य महाविद्यालय) हिने 'त्यांची नाही कुठे गणती' या लेखाचे वाचन केले. किरण लिमये (रुइया महाविद्यालय) याने आपली पारितोषिक विजेती 'प्रिय तुकाराम' ही कविता वाचून दाखवली.

यानंतर पुस्तक-प्रकाशन समारंभ झाला. आरंभी डॉ. अशोक केळकर यांच्या प्रतिनिधी सौ. दिशा केळकर यांचा सत्कार करण्यात आला. 'स्नेहवर्धन' प्रकाशनाच्या वतीने डॉ. स्नेहल तावरे यांनी डॉ. अशोक रा. केळकर यांचे हे पुस्तक आपल्याकडे प्रकाशनार्थ आले याबद्दल आनंद व्यक्त केला. डॉ. विजया देव यांनी 'वैखरी' या पुस्तकाचा परिचय करून दिला.

डॉ. केळकरांचे मनोगत डॉ. नीलिमा गुंडी यांनी वाचून दाखवले.

त्यानंतर प्रमुख पाहुणे श्री. डुंबरे यांनी आपल्या भाषणात डॉ. केळकरांनी त्यांना केलेल्या मार्गदर्शनाचा अनुभव सांगितला. या स्पर्धेमुळे विद्यार्थ्यांना व्यासपीठ मिळून चांगले लेखक तयार होण्यास मदत होईल, अशी अपेक्षा त्यांनी व्यक्त केली. मराठी ही पुण्या-मुंबईची मक्तेदारी राहिलेली नाही, असेही ते म्हणाले.

अध्यक्षीय समारोपात प्रा. प्र.ना. परांजपे यांनी मराठीचे व्याकरण इंग्रजीत लिहिणाऱ्या डॉ. केळकरांचा व 'वैखरी' यातील १८ लेखांचा उल्लेख करताना 'शब्द म्हणजे फुले' व 'वाक्य म्हणजे शब्दफुलांची सुंदर गुंफण असलेला गुच्छ' असे सांगून नवीन पिढीकडून चांगल्या लेखनाची अपेक्षा व्यक्त केली. ■

'सायली', श्रीरंग हौसिंग सोसायटी, बिबवेवाडी, पुणे 411 037. दूरध्वनी 24210985

लेखक-परिचय

- दा.ल. अडोणी : सागर विद्यापीठातून मराठीचे विभाग प्रमुख म्हणून निवृत्त.
- डॉ. द.भि. कुलकर्णी - पीएच्.डी.(मराठी), रशियन भाषेतील पदविका, नागपूर विद्यापीठातून मराठीचे प्रोफेसर व विभागप्रमुख म्हणून निवृत्त. एकतीस प्रकाशित ग्रंथ. पीएच्.डी. पदवीसाठी २५ विद्यार्थ्यांना मार्गदर्शन. अनेक पारितोषिके व सन्मानांचे मानकरी. मान्यवर शिक्षक.
- विश्वनाथ खैरे : केंद्रीय बांधकाम खात्यातून अभियंता म्हणून निवृत्त. संस्कृत, मराठी व तमिळ (संमत') या भाषांच्या परस्परसंबंधांचा विशेष अभ्यास. प्राचीन मिथ्यकथा, प्राचीन भारतीय संस्कृती व परंपरा या विषयांसंबधी लेखन. पुस्तकांना शासनाची पारितोषिके.
- डॉ. मृणालिनी गडकरी - एम.ए.,पीएच.डी., रवीन्द्रनाथ ठाकुरांची कविता आणि मराठी कविता यांचा तुलनात्मक अभ्यास. गोवा-हिंदू असो.चा जीए कुलकर्णी अनुवाद पुरस्कार (२००१), साहित्य अकादमीचा अनुवाद पुरस्कार (२००४), शरद समिती (प.बंगाल)चा शरद पुरस्कार (२००६). ५ अनुवादित पुस्तके प्रकाशित.
- डॉ. नीलिमा गुंडी : स.प.महाविद्यालय (पुणे) येथे मराठीचे अध्यापन, 'आभाळाचा फळा' व 'कानामात्रा' या दोन बालकवितासंग्रहांना महाराष्ट्र शासनाचे पुरस्कार. 'प्रकाशाचे अंग' या काव्यसंग्रहाला इचलकरंजीच्या आपटे वाचनमंदिराचा पुरस्कार.

- विजया चौधरी : मुंबई विद्यापीठातून एम.ए. (मराठी), पंजाब नॅशनल बँकच्या अधिकारीपदावरून स्वेच्छानिवृत्त. 'स्त्री-साहित्याचा मागोवा'च्या तिसऱ्या खंडामध्ये लेखन-सहयोग. मराठी अभ्यास परिषदेच्या कार्यकारिणीच्या सदस्य.
- डॉ. विद्यागौरी टिळक : मराठी विषयात एम.ए.,एम.फिल.,पीएच.डी. सोमेश्वरनगर (जि.पुणे) येथे १९८६ ते १९९६पर्यंत अध्यापन. १९९६पासून पुणे विद्यापीठाच्या मराठी विभागात प्रपाठक. 'मराठी वाङ्मयाची सद्य:स्थिती' (सहसंपादन), 'वाङ्मयेतिहास-लेखन - स्वरूप आणि संपादन' (संपादन),'समीक्षा-विविधा' (संपादन) ही प्रकाशित पुस्तके. कथा, कविता, लेख इ० स्फुट लेखन.
- डॉ. सदाशिव देव - एम.एस्सी.,पीएच.डी., गोवा विद्यापीठाच्या सायन्स फॅकल्टीचे डीन म्हणून निवृत्त. अमेरिकेत सात वर्षे उच्च गणिताचे अध्यापन, १२ विद्यार्थ्यांना पीएच.डी.साठी मार्गदर्शन. इंग्रजीमध्ये सहा आणि मराठीमध्ये दोन पुस्तके प्रकाशित.
- डॉ. हरिश्चंद्र थोरात - अनेक वर्षे कीर्ती महाविद्यालयात व गेली काही वर्षे मुंबई विद्यापीठाच्या मराठी विभागात मराठीचे अध्यापन, मराठीमधील अनेक प्रतिष्ठित नियतकालिकांतून समीक्षालेखन प्रसिद्ध. 'साहित्याचे संदर्भ' आणि 'कादंबरीविषयी' ही पुस्तके प्रसिद्ध. साहित्यप्रकार, कादंबरी, साहित्याचे समाजशास्त्र, आधुनिक व आधुनिकोत्तर सिद्धांत-व्यूह या विषयांमध्ये अभ्यासक या नात्याने रस.
- डॉ. ब्रह्मानंद देशपांडे - महामहोपाध्याय, विद्याभूषण, प्राचीन मराठी वाङ्मयाचे व्यासंगी संशोधक. 'देवगिरीचे यादव', 'शोधमुद्रा' इ० पुस्तके प्रकाशित.
- डॉ. जया परांजपे - एम.ए.पीएच.डी., पुणे विद्यापीठाच्या हिंदी विभागात प्रपाठक. हिंदी नाटकावर दोन पुस्तके प्रकाशित.
- प्रशांत बागड : पुणे विद्यापीठातून एम.ए. (तत्त्वज्ञान), इंग्लंडमधील युनिव्हर्सिटी ऑफ साउदॅम्टनमध्ये 'साहित्याचे तत्त्वज्ञान' या विषयावर पीएच.डी.साठी प्रबंधलेखन चालू. विलास सारंगांच्या काही इंग्रजी कथांचा मराठीत अनुवाद. कथा, कविता, समीक्षा इ. लेखन विविध नियतकालिकांतून प्रकाशित.
- शरदिनी मोहिते (बाबर) : एम.ए. (मराठी व संस्कृत), ६० नियतकालिकांत लेखन, समाजशिक्षण मालेमध्ये साहित्य, इतिहास, भाषा, भूगोल, मानसशास्त्र इ. विषयांवरील पुस्तके प्रकाशित. बालांसाठी चार कादंबऱ्या. 'थर्ड वेव्ह' (ऑल्विन टॉफलर), 'देवदास' व 'परिणीता' (शरच्चंद्र चतर्जी) या पुस्तकांची भाषांतरे प्रकाशित.

---

(१) वार्षिक वर्गणी भरण्यासाठी पत्रिकेचे वर्ष जानेवारी ते डिसेंबर असे आहे. वार्षिक वर्गणी - संस्थेला रु.१२५/-.पंचवार्षिक वर्गणी रु.५५०/-.व्यक्तीला रु.१००/-, पंचवार्षिक वर्गणी रु.४५०/- परदेशात अंक पाठविण्यासाठी टपालखर्च रु. १००/- अधिक.

(२) मराठी अभ्यास परिषदेची **आजीव सदस्यत्व (फक्त व्यक्तींसाठी) वर्गणी रु. १,००० आणि नोंदणी शुल्क रु. १००/-.** आजीव सदस्यांना 'पत्रिके'चा अंक पाठवला जातो.

(३) **पैसे भरण्याबद्दल सूचना :** वर्गणी प्रत्यक्ष, रोखीने, किंवा धनादेशाने देता येईल. **कृपया मनिऑर्डर पाठवू नये.** पाठवल्यास आपला पत्ता न विसरता लिहावा. धनादेश 'मराठी अभ्यास परिषद' या नावाने काढावा. **धनादेश पुण्याबाहेरच्या शाखेचा असल्यास रकमेत रुपये २०/- वटणावळ अधिक घालावी.** धनादेशासोबत आपले नाव, पत्ता, रक्कम, कोणत्या वर्षासाठी वर्गणी ते अवश्य लिहावे.

(४) **जाहिरातीसाठी नवे दर :** पूर्ण पान रु. २,५००, अर्धे पान रु. १,५००, पाव पान रु. ८००, शुभेच्छा रु. ४००/-, आवरण पृष्ठ तीन रु. ३,०००/- जाहिरात मराठीत असल्यास उत्तम, हिंदीत, इंग्रजीत असल्यास चालेल.

---

भाषाविज्ञानात क्रांती • चिन्हमीमांसेची नांदी • संरचनावादाची पायाभरणी.

बुकपोस्ट - बुकपॅकेट - त्रैमासिक
R. N. I. नोंदणी क्रमांक : ०-४००४८/८३



प्रेषक
कार्यवाह, मराठी अभ्यास परिषद
३, अन्नपूर्णा, १२५९, शुक्रवार पेठ, सुभाषनगर, गल्ली क्र.५
वाडिया हॉस्पिटलसमोर, पुणे ४११ ००२. (दू. क्र. २४४८६०१५)